




# शिवचरित

## मराठी भाषांतरासहित.



किंमत ७ आणे.




ॐ

रावसाहेब मल्लप्पा वसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ २९ वा.

# शिवचरित.

हा

( महाराष्ट्र तात्पर्यासह )

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

'श्रीदत्तप्रसाद' स्टीमप्रेसमध्यें छापवून प्रसिद्ध केला.

---

आवृत्ति १ ली प्रती १०००.

---

शके १८२८, सन १९०७.

---



---

किंमत ७ आणे.

# प्रस्तावना.

कांहीं दिवसांमागें शैवामध्यें शैवाग्रगण्य **कविवादिशेखर** नांवाचा सुप्रसिद्ध कवि होऊन गेला. त्यानें अनेक ग्रंथ केले असतील, परंतु ते आज उपलब्ध नाहींत. तथापि वीरशैव मतग्रंथांचा तपास करतां करतां या महाकवीनें केलेला "**शिवचरित**" नांवाचा ग्रंथ अनायासें सांपडला. या ग्रंथाची योग्यता असाधारण आहे, यात शंका नाहीं. हा ग्रंथ वाचला असतां वाचकांना व्यावहारिक ज्ञानाची चांगलीच मदत होऊन अंगांत सर्वोत्कृष्ट रसिकपणा निःसंशय येतो. उदाहरणार्थ यांतले कांहीं श्लोक येथें दिले आहेत ते पाहिले असतां वाचकांची खात्री होईल.

मार्कंडेयाख्यानांतील मृकंडुशीलवती संवाद पृष्ठ ९।६.

(मृकण्डु) त्वद्गर्भशुक्तिनिर्भिन्नं सुवृत्तं सुतमौक्तिकम् ॥
वंशश्रीतिलकं द्रष्टुं मन्दभाग्या वयं प्रिये॥२६॥

(शीलवती) अंगस्पर्शैरमृतलहरीमज्जनस्यांतरंगैरातन्वानं मनसि महता मन्तरानन्दलक्ष्मीम् ॥ पुत्रं पित्राप्य-सकृदसकृत्पूजितं वीक्षणाद्यैः पुण्या काचिज्जगति लभते भूषयन्तं निजांकम् ॥२७॥

कालकूट विषपानकथा पृष्ठ ५०.

(देवांची प्रार्थना) कोलाहलेन बहुना किमशेषबन्धो हालाहलेन जलधेर्वयमात्तसाराः ॥ मृत्योरकांडमधुना विषयी भवामो मृत्युंजयाशु परिपालय नः प्रपन्नान्॥४२॥

(देवीची विनन्ति) सामिदग्धवपुषो विषाग्निना त्वामनन्यशरणान् समाश्रितान् ॥पाहि शंकर सुरान् महीयसामार्तरक्षणकला हि भूषणम् ॥५६॥

दक्षाध्वरध्वंसवर्णन सतीपरमेश्वरांचा संवाद पृष्ठ. ८०-८१.

(सती) मङ्घ्राग्र्यं सकलामरेंद्रतरुणीधम्मिल्लमालागलन्माध्वीपंकिलपादुकं मम महादेवीति नामांकितम् ॥ निःसापत्न्यकथांकुरा मयि विभो स्नेहप्रवृत्तिश्च ते कांक्षे गन्तुमथाप्यहं पितृगृहं का वान्यनारीकथा ॥७२॥

(शिव) नेत्रामृतांजनकले निरवधिकप्रेमपुष्पमधुधारे ॥
कल्याणि गौरि सहसा कथमिव विरहाय साहसं कुरुषे॥७५॥

वर दिलेले श्लोक अतिशय हृदयद्रावक असून यांमध्यें व्यवहार तर ओतप्रोत भरलेला आहे. तात्पर्य हें कीं, या ग्रंथकर्त्या कवीची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे.

या ग्रंथाचें मराठी भाषांतर वे. शा. सं. रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनीं केलें आहे. या ग्रंथाची शुद्धि व प्रूफ तपास वगैरे कामें वे. मू. मल्लिकार्जुन-शास्त्री जैनापूर व वे. मू. जगदीशशास्त्री नालवार यांनीं केलीं आहेत.

मूळ ग्रंथ वे. मू. पर्वतशास्त्री कंदगल्लु यांनीं दिला आहे, याबद्दल वरील सर्व मंडळीचे आह्मी आभारी आहोंत.

प्रसिद्धिकर्ता.

---

## विनंति

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मां-कडे अगर रावसाहेब मल्लप्पा वसप्पा वारद सोलापूर यांचेकडे पाठ-वून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथा-शक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्याची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं आपली मूळ प्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.

# संस्कृतशुद्धाशुद्धपत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | पंक्ति. |
|---|---|---|---|
| वक्ष्यि | वीक्ष्य | ६ | ९ |
| रसजां | रजसां | ९ | ५ |
| पादपदम् | पादपम् | १० | ५ |
| प्रसादोऽहि | प्रासादो हि | १२ | ३ |
| लाचेन | लोचन | १६ | १० |
| महिधर | महीधर | ३१ | ६ |
| प्युपाशः | प्युपास्यः | ३२ | ३ |
| मुद्वलित | मुद्गलित | ३७ | ११ |
| हैमवतलिंभित | हैमवतीलंभित | ५४ | ७ |
| केलकिल | कलीकल | ५४ | १० |
| सीत | शीत | ५५ | १२ |
| तिग्मांसु | तिग्मांशु | ६५ | ८ |
| यक्षामहे | यक्ष्यामहे | ७० | ७ |
| सद्वृत्ताः | सद्वृत्ता | ७१ | २ |
| मुष्टान्नेषु | मृष्टान्नेषु | ७१ | ३ |
| वजि | वीज | ७९ | २ |
| गोष्ठीषु | गोष्ठीषु | ९३ | ४ |
| वीरो | वीरो | १०० | ९ |

# मराठी शुद्धाशुद्धपत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | पंक्ति. |
|---|---|---|---|
| प्रथमम:च | प्रथमता च | १ | २५ |
| सुवणर्कमलैं | सुवर्ण कमलैं | ८ | १४ |
| उपजविनाकरितां | उपजीवनाकरितां | ८ | २८ |
| परमेश्वर्याच्या | परमैश्वर्याच्या | १० | १५ |
| अनुवंशिक | आनुवंशिक | २८ | १५ |
| जगव्द्ंधो | जगद्बंधो | ५० | २३ |
| मुनकिडून | मुनीकडून | ७८ | ३० |
| आले | आलें | ७९ | २२ |
| जभि | जीभ | ९३ | १८ |
| सुगंघमय | सुगंधमय | १०२ | २७ |
| शास्त्रांतलि | शास्त्रांतील | १०३ | २१ |

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# ॥ श्रीशिवचरिते ॥

## ॥ प्रथमोच्छ्वासः ॥

श्रीगुरुदक्षिणामूर्तये नमः॥ वंदे वेतंडवदनं यच्छुंडा लीलयोध्द्वता॥ ब्रह्मांडमंडपारंभस्तंभतां लंभते क्षणम्॥१॥वाणी तांडवमाधत्तां मज्जिव्हारंगमंडपे ॥ हृद्या यद्भूमिकालीला विद्या वेदपुरःसरा ॥२॥ अभूदभूतप्रतिमे महेश्वरे निरुद्धचेता निगमांतसारवित्॥ कलानिधिः कौशिकवंशवारिधेः कविः प्रतीतः कविवादिशेखरः ॥३॥ जन्मनः प्रभृति देवतांतरं यन्मनः परिविधूय केवलम् ॥ कामिनीकवलितार्धविग्रहं यामिनीरमणचूडमन्वगात् ॥४॥ हेमाद्रिरिव यस्यासीन्नान्यस्मै नमते शिरः ॥ अंतरेण महादेवं हंतारं तिसृणां पुराम् ॥५॥ श्रीकंठदर्शननिरूपणभाग्यलक्ष्मीसिंहासनप्रथमदेशिकतानिबद्धः ॥ पट्टाभिषेचनविधिः

---

श्रीगुरुदक्षिणामूर्तीस नमन असो. (१) ज्यानें आपला शुंडादंड (सोंड) सहज लीलेनें वर उचललेला आहे, व जो ब्रह्मांडरूपी मांडवाच्या आरंभाचा खांब आहे, ज्याचे डोळे पाणीदार आहेत, अशा गजाननाला नमस्कार करतों. (२) जिची भूमिका (वेष) वेदप्रमुख विद्या आहे, अशी ती सरस्वती माझ्या जिव्हारूप रंगमंटपावर यथेच्छ नाचत राहो. (३) ज्याच्या बरोबरीचा दुसरा देव नाहीं, अशा महेश्वराच्या ठिकाणीं ज्याचें मन तल्लीन झालें आहे, व जो वेदांताचा सार जाणतो, जो कौशिकवंशरूपी समुद्रांतला चंद्रमा आहे, असा कविवादिशेखर नांवाचा मोठा कवि जगांत प्रख्यात होऊन गेला. (४) ज्याचें मन जन्मापासून इतर देवांपासून अलिप्त आहे, आणि अर्धनारीनटेश्वर अशा चंद्रशेखराच्या ठिकाणीं (श्रीशिवाच्या ठिकाणीं) तल्लीन होऊन राहिलें आहे. (५) त्रिपुरासुराचा नाश करणाऱ्या महादेवाशिवाय ज्याचें डोकें दुसऱ्या देवांपुढें मेरुपर्वताप्रमाणें वांकत नाहीं. (६) श्रीशिवदर्शनच एक भाग्यलक्ष्मी जी आहे, तिच्या सिंहासनावर प्रथमतःच गुरुत्वानें बांधला गेलेला असा जगप्रसिद्ध अभिषेकसमारंभाचा विधि (ज्याला पहिल्यांदाच शिवदर्शन झालें यामुळें ज्यानें अभिषिक्त

प्रथितः पृथिव्यामेकाम्रनाथसविधेऽजनि यस्य कांच्याम् ॥६॥ तमादिशत्तापसवेषधारी स्वप्ने कदाचित्स्वयमेत्य शंभुः ॥ निजापदानैरखिलैरुपेतं प्रबंधमेकं परिकल्पयेति ॥७॥ अनुपदमभिजातगद्यपद्यप्रतिपदपल्लवितप्रसादरस्यम् ॥ अकृत स कविवादिशेखरोऽयं शिवचरितं रसभासुर (प्रधानं) प्रबंधम् ॥८॥ प्रथमापत्यसौभाग्यं पार्वतीपरमेशयोः ॥ भजे गजेंद्रवदनं प्रत्यूहव्यूहशांतये ॥९॥ नमस्त्रैलोक्यनलिनीविलासविसतंतवे ॥ त्र्य्यंतसौधवलभीकपोताय कपर्दिने ॥१०॥ हृदयेऽस्तु परं वस्तु हृल्लेखाशुक्तिमौक्तिकम्॥ शतानंदादयो देवा यदानंदाब्धिबिंदवः ॥११॥ कृतिने कालिदासाय क्रियते विनयांजलिः ॥ कवित्वमौक्तिकं यस्य त्रिलोकीतिलकायते ॥१२॥ क्षेमेंद्राय कवींद्राय

---

राजाप्रमाणें शिवाची सेवा एकनिष्ठपणें आरंभिली,) कांचीपुरांत श्रीएकाम्रनाथाजवळ प्रसिद्ध झाला. (कांची मध्यें ज्यानें एकाम्रनाथाची सेवा आरंभिली असें तात्पर्य आहे.) (७) अशा त्या कवि वादिशेखराच्या स्वप्नामध्यें एकदां श्रीशिवानें तापस्याच्या वेषानें येऊन सांगितलें कीं अरे, तूं सर्व आपल्या अपदानांसह असलेला (पूर्वचरित्रांनीं युक्त असलेला) असा एखादा ग्रंथ कर. (८) असें तें वाक्य ऐकून कविवादिशेखरानें शिवचरित्ररूप ग्रंथ रचला. या ग्रंथामध्यें पावलोपावलीं गद्यपद्यें आढळत असून प्रत्येक गद्यांतल्या व पद्यांतल्या प्रत्येक पदामध्यें प्रसादगुण स्पष्टपणें दिसतो, आणि मोठा रसविशिष्ट आहे. (९) (ग्रंथारंभीं कवि विघ्नें जाण्याकरितां गणपतीची स्तुति करतो.) पार्वती परमेश्वरांला जें पहिलेंच मूल झालें, अशा त्या गजाननाला मी विघ्नशांतिकरितां भजतों. (१०) (आतां उपास्य देवतेची स्तुति करतों.) त्रैलोक्यरूपी कमलिनीच्या देठांतील जो तंतु आहे (जो त्रैलोक्याचा आधार आहे) व जो वेदांतरूप महालांतील वलभीमधला (पक्षी बसण्या करितां माडीच्या घरापुढें लहान लहान कोनाडे सोडतात त्याला वलभी ह्मणतात.) कबूतर आहे ( जो वेदांतशास्त्राच्या ज्ञानानें समजण्यास योग्य आहे) अशा त्या श्रीशिवाला नमन असो. (११) अंतःकरणांतील रेषारूपी शिंपीमध्यें मोत्याप्रमाणें असणारी ती परवस्तु ( परशिव ) माझ्या हृदयांत नेहमीं राहो. कारण शतानंद वगैरे देव ज्याच्या आनंदरूप समुद्रांतील बिंदूप्रमाणें झाले आहेत. ( तद्रूप झालेले आहेत असें तात्पर्य आहे ). (१२) ( कालिदासाचें वर्णन कवि करतो. ) चतुर अशा कालिदासाला विनयपणें मी हात जोडतों. कारण ज्याचें कवित्व मोत्याप्रमाणें व त्रैलोक्यामध्यें तिलकाप्रमाणें चमकतें- (१३) क्षेमेंद्र नां-

क्षेममाशास्महे वयम् ॥ स्वादुना यत्कवित्वेन सुधास्तुतिरियं मुधा ॥१३॥ काव्येषु सुकुमारेषु काठिन्यं कुत्रचित्प्रियम् ॥ कलेवरेषु नारीणां काठिन्यं कुचयोरिव ॥१४॥ प्रतिभामूलभाव्यस्य श्रुतिपल्लवशोभिनः॥ कविताकल्पवृक्षस्य कालकंठनुतिः फलम् ॥१५॥ स जयति हरदत्तः सर्वविद्याधिपत्ये पशुपतिवरदत्तो यस्य पट्टाभिषेकः ॥ दिशि दिशि विदितानां यद्यशोमंजरीणां परिमलपरिवाहे मज्जतीव प्रपंचः ॥१६॥ तर्कस्तनीं सरसकाव्यकलाधरोऽस्मिन् त्र्यंतकुंतलभरामितिहासहाराम् ॥ पाणीभवत्प्रबलपाणिनितंत्रमालां वाणीं भजे निगमबाह्यमनःकृपाणीम् ॥१७॥ गद्यं॥ प्रथममिह पशुपतेः कालकालस्य कालमथनकथा प्रस्तूयते ॥ पद्यम् ॥आसीदाजन्मशुद्धानां नासीरो ब्रह्मवादिनाम् ॥ मृगकंडूयनपरो मृकंडुरिति तापसः ॥१८॥ निक्षेपो धर्मसारस्य

---

वाच्या कवीचें क्षेमचिंतन आह्मी नेहमीं करतों. कारण ज्या कवीच्या कवितेच्या गोडीपुढें अमृताची गोडी खोटी ठरली. (१४) सुंदर स्त्रियांचे अवयव सर्व कोमल असून केवळ स्तनामध्यें असलेला कठोरपणा जसा आवडतो, तद्वत सुकुमार अशा कवितेमध्यें कोठेंतरी एखादेवेळेस कठिण पद घातलें तर तें रसिकांना प्रिय होतें. (१५) प्रतिभाच ( कौशल्य ) ज्याचें मूल आहे, ( मुळ्या आहेत ) श्रुतिच ज्याचीं सुशोभित पानें आहेत अशा कवितारूपवृक्षाला फल ह्मणजे श्रीकालकंठाला नमन करणें हेंच होय. (१६) सर्व विद्यांच्या आधिपत्यांमध्यें त्या हरदत्ताचा जयजयकार असो, कारण साक्षात श्रीपशुपतीनें अमौलिक वर देऊन सर्व विद्येवरचा अधिकार देण्याकरितां ज्याला अभिषेक करविला आहे. त्यामुळें त्या हरदत्ताची कीर्ति जगांत जिकडे तिकडे पसरून त्या कीर्तीच्या सुगंध प्रवाहामध्यें सर्व जग बुडालें आहे कीं काय ? असा भास होतो. (१७) जिला तर्करूप दोन स्तन आहेत, जिला वेदांतरूप कुरळ केश शोभत आहेत, जिच्या गळ्यांत इतिहासरूप हार शोभत आहेत, जिच्या हातांत पाणिनीचें व्याकरणरूप माळ शोभते, जी वेदबाह्यांच्या मनाला तरवारीप्रमाणें दिसते अशा त्या सरस्वतीला यावेळेस सरसकाव्यांतील कला धारण करणारा मी भजतों. (१८) असो, प्रथम मी कालाचाकाल अशा पशुपतीनें यमाला शासन जें केलें ती कथा सांगावयास आरंभ करतों. —— जन्मल्यापासून शुद्ध असलेल्या अशा ब्रह्मवादिलोकांमध्यें मृकंडु नांवाचा तापसी होऊन गेला. त्याला हरिणाला खाजविण्याचा नाद असल्यामुळें मृकंडु असें नांव पडलें होतें. (१९) तो मृकंडु ऋषि धर्मांतल्या

निकषोऽध्यात्मसंपदः॥विद्यालतानामुद्यानं विलासो विनयश्रियः॥१९॥ तस्य शीलवती नाम समजायत गेहिनी ॥ अरुंधतीगुणश्लाघं न्यरुंध चरितेन या ॥२०॥ स तया धर्मकांतारलतया मुनिपुंगवः ॥ चूडामणिरभूत्सोमपीथिनां गृहमेधिनाम् ॥२१॥ नंदनं न तथाऽविंदन्नयनानंदचंदनम् ॥ऋणस्थः स गृहस्थोऽभूत्पितॄणां पितृवत्सलः ॥२२॥ गद्यं ॥कदाचिदनपत्यताजनितदौस्थ्यमात्मनो गार्हस्थ्यमंतरनुसंदधन्नंतिकस्थामात्मसमावस्थामार्यो भार्यामेवमवादीत् ॥ कल्याणि कालेनापि महता कथमिव वयं सुतमुखकमलावलोकनसुखपरीवाहस्य दूरे संवृत्ताः संतानवत्ता हि सारः संसारस्य कृतार्थिता गृहमेधितायाः परिपूर्तिः भवसागरस्य मूर्तिः प्रमोदस्य कीर्तिपताका वंशस्य पल्लवः

---

साराचा खजिना होता, आणि अध्यात्मसंपत्तीच्या कसाला पूर्णपणें उतरला होता, व विद्यारूप वेलीचा बाग होता ( विद्येंत परिपूर्ण होता ), आणि विनयसंपत्तिचें विलासस्थान होता ( विनयगुणानें युक्त होता ). (२०) अशा त्या मृकंडु ऋषीला शीलवती नांवाची सुशील गृहिणी होती ( बायको होती ). त्या शीलवतीनें आपल्या गुणांनीं अरुंधतीचें ( वसिष्ठाच्या बायकोचें ) चरित्र लोपवून सोडिलें होतें. (२१) धर्मरूप अरण्यामध्यें वेलीप्रमाणें शोभणाऱ्या त्या शीलवतीमुळें सोमपान करणाऱ्या गृहस्थाश्रमी लोकांमध्यें शिरोरत्नाप्रमाणें तो मुनि शोभत होता. (२२) अशा मृकंडु ऋषीला डोळ्याला चंदनाप्रमाणें गार करणारा ( डोळ्याला संतोष देणारा ) असा एक मुलगा झाला नाहीं, यामुळें तो पितृवत्सल मुनि आपल्या पूर्वजांचा ऋणी झाला होता. (२३) असें असतां कोणे एके वेळेस पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें मन अस्वस्थ होऊन आपल्या गृहस्थाश्रमाचा विचार अंतःकरणामध्यें करीत तो मुनि बसला होता. तेव्हां आपल्याजवळ बसलेल्या बायकोला त्यानें पाहिलें तर तिचीहि दशा तीच झाली होती, अशा रीतीनें काळजी करीत बसलेल्या आपल्या बायकोला त्या मुनीनें ह्मटलें कीं, शीलवति, सुशीले, आपल्या आयुष्याला इतके दिवस होऊन गेले, तथापि आमच्या नशीबीं मुलाचें तोंड पाहण्याचें सुख नाहीं काय? अजून आह्मी त्या सुखापासून अतिशय दूर आहोंत काय? पहा स्त्रिये, संसारांतला मुख्य सार ह्मणजे पोटीं पुत्रसंतान असणें हेंच होय. गृहस्थाश्रमांतला कृतकृत्यपणा पुत्रच होय. संसारसमुद्राची समाप्ति ह्मणजे पुत्रच होय, आनंदाची मूर्ति ह्मणजे पुत्रच होय, आपल्या वंशाचा ध्वज ह्मणजे पुत्रच

कल्याणपादपस्य परिमलः सौभाग्यकुसुमस्य प्राणकला धर्मस्य प्रतिष्ठा नर्मविलासस्य सेतुर्धृतितटाकस्य हेतुरमृतत्वस्य जगति समस्तानां गृहस्थानाम् ॥ पद्यम् ॥ वर्धते न चिरं लोके वंशलक्ष्मीरसंततिः ॥ स्वल्पावशेषितस्नेहज्योतिर्मालेव दीपिका ॥२३॥ अप्रबोधमिव विप्रगौरवं निष्प्रसूनमिव केलिकावनम् ॥ पश्यतः कुलममुत्र मंगलं मज्जतीव शुचि मानसं मम ॥२४॥ गृहे जानुचरः केल्यां मुग्धस्मितमुखांबुजः ॥ पुत्रः पुण्यवतामेव पात्रीभवति नेत्रयोः॥२५॥ त्वद्गर्भशुक्तिनिर्भिन्नं सुवृत्तं सुतमौक्तिकम्॥वंशश्रीतिलकं द्रष्टुं मंदभाग्या वयं प्रिये ॥२६॥ गद्यं ॥ इति गदति प्रणयवति प्राणनाथे दैन्यवती शीलवती दीर्घं निःश्वस्य सनिर्वेदमिदमवोचत् ॥ पद्यम् ॥ अंगस्पर्शैरमृतलहरीमज्जनस्यां तरंगैरातन्वानं मनसि महतामंतरानंदलक्ष्मीम् ॥ पुत्रं पित्राप्यसकृ-

---

होय, कल्याणरूपी वृक्षाची पालवी पुत्रच होय, सौभाग्यरूप फुलाचा सुगंध पुत्रच होय, तो पुत्र प्राणाची धर्मकला होय, पुत्रच थट्टेची आणि विलासाची प्रतिष्ठा (स्थान) होय, पुत्रच धैर्यरूप तलावाचा पूल होय, फार काय सांगूं, शीलवति, सर्व गृहस्थाच्या जिण्याला मुख्य कारण पुत्रच होय. हे शीलवति, ज्याच्या पोटीं संतति नाहीं, त्याची वंशलक्ष्मी जगांत लौकरच नाहींशी होते बरें. तेल जर थोडें असलें तर तो दिवा पुष्कळ वेळ टिकेल काय? (२४) ज्या ब्राह्मणामध्यें ज्ञान नाहीं त्या ब्राह्मणाच्या ठिकाणीं गुरुत्व ( श्रेष्ठपणा ) जसें राहत नाहीं, केळींचा बाग आहे परंतु केळींला फुलेंच येत नाहींत तर तीं झाडें पुष्कळ दिवस जसें जगांत टिकत नाहींत, त्याप्रमाणें माझ्या वंशाकडे पाहिलें ह्मणजे माझा वंश बुडतो कीं काय असें मला वाटतें. (२५) हे शीलवति, मुग्धपणें गोजिरवाणें जो हंसतो, व रांगत रांगत जो खेळतो, असा मुलगा पुण्यवानाच्या डोळ्यापुढेंच दिसतो नाहीं बरें? ( अर्थात् आह्मी पातकी आहोंत काय? असें तात्पर्य आहे. ) (२६) प्रिये, शीलवति, तुझ्या गर्भरूप शिंपीपासून वर्तुलाकार मोत्याप्रमाणें चमकणारा व आमच्या वंशाला तिलकाप्रमाणें शोभणारा मुलगा पहावयास आह्मी हतभागी ( दुर्दैवी ) झालों ना? (२७) आवडता पति असा मृकंडु ऋषि याप्रमाणें बोलत असतां शीलवतीनें फार मोठा एक श्वास टाकून वैराग्यानें युक्त असें भाषण केलें. महाराज, मुलांचा अंगस्पर्श झाल्याबरोबर अमृताच्या प्रवाहामध्यें स्नान केलें असतां जो आनंद व्हावा तो आनंद मनामध्यें होतो, आणि वारंवार जनकानें ( बापानें ) मुलाकडे पाहून मुलाचा सत्कार करावा, अशा मुलाला आ-

दसकृत्पूजितं वीक्षणाद्यैः पुण्या काचिज्जगति लभते भूषयंतं निजांकम् ॥२७॥ न शोभते तथा नारी हाराद्यैरंगभूषणैः ॥ अंकालंकाररत्नेन यथापत्येन चारुणा ॥२८॥ आनंदस्रुतिरात्मनो नयनयोरंतःसुधाभ्यंजनं प्रस्तारः प्रणयस्य मन्मथतरोः पुष्पं प्रसादो रतेः॥ आलानं हृदयद्विपस्य विषयारण्येषु संचारिणोर्दंपत्योरिह लभ्यते सुकृतिनोः संसारसारः सुतः ॥२९॥ गद्यम् ॥ मंदभाग्याया मम वत्समुखावलोकनमहोत्सवो दुर्लभो जात इति वल्लभाभिमुखमरोदीत् ॥ पद्यम्॥ तां प्रियां नयननालनिष्पतद्बाष्पदंतुरकपोलवंधुराम् ॥ वीक्ष्य शोकविवशाशयां वशी वाक्यमेवमवदत्स वाक्यवित् ॥३०॥ मुंच शोकमपि पंकजानने संचयस्तपस एव तन्यताम्॥ वंशशेखरमणिं सुतं दिशेच्चंद्रशेखरमणिर्यथा शिवः ॥३१॥ पुत्रीयता खलु पुरा पुरुषोत्तमेन व्यासाभिधानमुनिना

---

पल्या मांडीवर खेळविणारी कोण एखादी स्त्री असेल तीच पुण्यवती असेल ना? (२८) महाराज, रत्नालंकाराप्रमाणें शोभणाऱ्या सुंदर मुलाला मांडीवर घेतल्यानें जशी स्त्री सुशोभित दिसते, त्याप्रमाणें सगळ्या अंगावर दागिने घातल्यानें स्त्री सुशोभित दिसत नाहीं. (२९) आपल्या दोन्ही डोळ्यांच्या आनंदाचा प्रवाह, डोळ्याच्या आंतलें अमृताचें काजळ, अंतःकरणाची वाढ, मन्मथवृक्षाचें फूल, रतिसुखाचा प्रसाद, विषयरूप अरण्यांत भटकणाऱ्या मनरूप हत्तीचें आलान, (हत्ती बांधावयाची जागा) संसारांतला मुख्य सार असा मुलगा मिळावयाचा झाल्यास पुण्यवान दंपतीलाच मिळतो ना? (३०) महाराज मी अतिशय दुर्दैवी आहे ह्मणूनच मुलाचें तोंड पहावयास मला मिळत नाहीं. महाराज, तो समारंभ मला फार दुर्लभ झालाहो झाला, असा आक्रोश करून आपल्या पतीकडे दीनवाणें तोंड करून ती शीलवती रडूं लागली. (श्री) तिच्या दोन्ही डोळ्याच्या प्रांतभागानें अश्रुधारा येऊन गालावर पडूं लागल्या, शोकानें ती शीलवती परवश झाली, अशा आपल्या बायकोला पाहून बोलण्यांत चतुर असा जितेंद्रिय मृकंडु ऋषि आपल्या पत्नीला बोलला. (३१) अगे कमलमुखि, कां विनाकारण शोक करतेस, रडूं नको, धैर्य धर, तपश्चर्येचा संचय कर ह्मणजे तो साक्षात् प्रभु चंद्रशेखर आपल्याला खरोखर वंशांतील श्रेष्ठमणि असा मुलगा देईल. (३२) तुला खात्री पटत नसेल तर मागचीं उदाहरणें सांगतों पहा. हे शीलवति, साक्षात् विष्णूनें तपश्चर्या केली ह्मणून त्याला श्रीशिवानें प्रद्युम्न नांवाचा मुलगा

च शिलादनाम्ना ॥ संप्रीणितः पशुपतिस्तपसा ततोऽमी पुत्रानवापुरि-
ति पूर्वविदो वदंति ॥३२॥वयमपि तपसा महीयसा तं पशुपतिमेकमु-
पास्य दास्यवृत्त्या ॥ कुलतरुकुसुमं कुमार्गहीनं विततनयं तनयं व्रजा-
म यावत् ॥३३॥ गद्यम् ॥ एवमभिधाय स मुनिः स्वमतानुकूलवादि-
न्या सह गेहिन्या तपसे कृतमतिः संतलनिकटकंदलितकुंदमंदारमा-
कंद -पनस-ताल-पूगपुन्नागनारिंग-नारिकेलतरुप्रमुख--तरुपटल--जटि-
लनिकटां विकटतटरूढेन पादपनिवहेनापि विकचकुसुमफलभरनमि-
तशिखरतया मदकलविहगकुलकलरवमुखरतया च निजमूलोन्मूल-
निवृत्तये सप्रणाममभिष्टूयमानामिव सततसलिलविहरणनिरतसवि-
धविविधपुरवरयुवतिकठिनकुचतटताडनतृ-( त्रु )-टितहारनिपातितं
राशीभूतं मणिनिवहमविरतं मानयंतीममृतमथनसमयविबुधहृतनि-
खिलरत्ननिचयस्य निजपतेः पुनरपि रत्नाकरतामुपपादयितुमुद्यक्ता-

---

दिला, व्यासानें तप केलें, त्याला शुक नांवाचा मुलगा दिला, शिलाद मुनीनें तप केलें त्याला नंदी नांवाचा मुलगा दिला असें त्यावेळचें वृत्तांत जाणणारे मोठमोठे ऋषि सांगतात. (३३) याकरितां हे शीलवति, आह्मी देखील अशाच तऱ्हेची श्रेष्ठ तपश्चर्या करूं; साक्षात पशुपतीचे दास होऊं; त्याची उपासना करूं; नंतर सन्मार्गीनें वागणारा, कुलवृक्षाचें फूल, विनीत, असा मुलगा मिळवूं. (३४) असें मुनीचें वचन ऐकिल्यावरोबर तिनेंही अनुकूल अभिप्राय दिला. नंतर त्या मुनीनें आपल्या बायकोसह तपश्चर्येस जाण्याचा विचार केला. नंतर जिच्या कांठांवर कुंद, मंदार, माकंद, फणस, ताड, सुपारी, पुन्नाग, नारिंग, नारळ वगैरे झाडें अतिशय दाट असल्यामुळें व कांठावर भरभराटीनें वाढल्यामुळें प्रत्येक झाडाला अतिशय फुलें आलीं होतीं आणि फळांचे घोंसचे घोंस लोंवत राहिले होते त्यामुळें झाडांच्या फांद्या वांकून गेल्या होत्या, आणि फुलांच्या वासाला भ्रमर येऊन गुंजारव करीत होते आणि फळें खाऊन मस्त झालेले पक्षी कलकल करीत होते, यामुळें या जगांत पुनः आपल्यास जन्म घेणें नको असें भासविण्याकरितां कोणत्या देवाला नमस्कार करून स्तोत्र करीत आहेत काय? याप्रमाणें तीं झाडें दिसत होतीं, व जिच्या पाण्यांत नेहमीं क्रीडा करणाऱ्या पुरस्त्रियांचे हार तुटून पाण्यांत पडत असल्यामुळें त्या रत्नांला मान देते कीं काय? अशी जी भासत होती, व अमृतमथनाचे वेळेस सगळ्या देवांनीं रत्नें नेलीं होतीं ह्मणून पुनः आपल्या नवऱ्याला " रत्नाकरत्त्व " ही पदवी आणून देण्याकरितां झटते कीं काय?

मुन्मत्तरिरंसुकलहंसचरणहननचलितचामीकरकमलनिकरनिरंतरनि-
ष्यंदमानबहुलमकरंदास्वादतुंदिलमंदमरुदाडंबरचुंबितपथिकजनपरि-
श्रमामजस्रमपि सन्निकृष्टमहीधरकटकसमाकृष्टविविधाविटपिविशे-
षतया मथनहृतसकलविबुधतरुविभवाय जलनिधये पुनरपि भु-
वनांतरादमरतरुसंततिमिवानयंतीमुभयतटपरिसरोपविष्टदैष्टिकनिर-
चितचंडकरदंडनमस्कारप्रवणसैकतमंडलामखंडगुणपांडित्यपौरा-
णिकप्रकांडपापठ्यमानहरिहरपुराणश्रवणसमुत्कंठितद्विजवराधि-
ष्ठितसंध्यामठसमुदायां मुकुंदावतारपरंपरामिव प्रकटितमत्स्यकूर्मा-
दिबहुरूपां साधुजनसंपदवस्थामिव सकलजनोपभोज्यबहुजीवनाम्
निरवधिकेन अनितरसाधारणेन निजमहिमविशेषेण निन्हुतजन्हुकन्या-
म् निंदितकलिंदजां निर्भर्त्सितचंद्रभागां परिहसिततुंगभद्रां कुत्सित-

---

अशी जी भासत होती, मस्त असे कलहंस आपल्या पायाच्या मारानें पाण्यांतलीं सगळीं सुवर्णकमलें खालीं पाडीत होते, त्यामुळें कमलांतील मकरंद जिकडे तिकडे पसरला होता तो मकरंद पिऊन पिऊन पोटाळु झालेला मंदमारुत हा जिच्या कांठावर उतरलेल्या पांथांच्या श्रमांचा परिहार करित होता, व समुद्राजवळ डोंगर फार होते त्या डोंगरावरच्या सुळक्याला घांसून घांसून सगळीं देवांचीं( कल्पवृक्ष वगैरे ) झाडें खालीं पडलीं होतीं त्यामुळें आपला पति समुद्र याचें वैभव गेलें होतें तें पुनः अन्यलोकापासून ( भूलोकापासून ) आणून देण्याकरितां पुनः देवांचीं झाडें ( कल्पवृक्ष वगैरे ) वाढविण्याच्या खटपटींत आहे कीं काय ? अशी जी भासत होती, व दोन्ही कांठांवर येथपासून तेथपर्यंत पसरलेल्या वाळूवर सूर्यांचीं प्रचंड किरणें पडलीं होतीं त्यामुळें सूर्य हा दंडाकार नमस्कार जिला घालतो कीं काय असें दिसत होतें, व अगणित गुणांमुळें पांडित्य मिळविलेले लोक अनेक पुराणांतील हरिहरांचें चरित्र सांगत बसले होते तें पुराण ऐकण्याकरितां मोठे मोठे ब्राह्मण संध्याकाळचे वेळेस जिच्या कांठावर नित्य येत होते, आणि जिच्या पाण्यांत मासे, सुसरी वगैरे जलचर प्राणी अगणित असल्यामुळें साक्षात विष्णूप्रमाणें आपणही मत्स्यकूर्मादि अवतार घेतले कीं काय? अशी जी भासत होती, व सज्जनांच्या संपत्तीप्रमाणें सर्व लोकांच्या उपजीवनाकरितांच निर्मळ पाण्याच्या प्रवाहरूपानें वाहते कीं काय ? अशी जी दिसत होती, श्रेष्ठ, असाधारण अशा आपल्या महिमेनें जान्हवीला मागें जिनें टाकिलें आहे, व यमुनेचें तर जिच्यापुढें कांहीं चालतच नाहीं ( यमुनेची निंदा करणारी ) व चंद्रभागेची नि-

गोदावरीं कावेरीं सरितमायासीत् ॥ पद्यं ॥ यामाहुरिंदीवरबंधुराक्षीं कोकस्तनीं कोमलवीचिहस्ताम् ॥ कवेरकन्येति भुवि प्रतीतां कलत्ररत्नं कलशांबुराशेः ॥३४॥ सोमपानसदृशं वदंति यत्तोयपानमुपकंठवासिनाम् ॥ यत्तटांतरसजांगसंगिना क्षाल्यते सकलमांतरं रजः ॥३५॥ ॥ गद्यम् ॥ स तत्र सकलत्र एव पवित्रतनुः प्रतिदिवसं स्नानविधिना तपश्चकार गुरुं तदुपांतसंनिहितं सकलमुनिजनशरण्यं श्वेतारण्यपतिं पशुपतिं प्रपन्नः श्रुतिसंपन्नः ॥ पद्यम् ॥ उमामहेश्वरं धाम लोकचित्तानुरंजनम् ॥ पूजयन् सर्वकरणैः पुत्रार्थं स तपोऽतपत् ॥३६॥ अप्रत्यक्षे विरूपाक्षे चिरेणापि चिरंतने ॥ स तपस्वी तपः स्वीयं व्यतनोदुत्तरोत्तरम् ॥३७॥ अग्रेसरः स तपसामुग्रे तपसि संचरन् ॥ अंतरिक्षे विरूपाक्षमपश्यद्विश्वनायकम् ॥३८॥ त्रैगुण्यवासनातीतं त्रयीसीमंतमौक्ति-

---

भर्त्सना जी करीत आहे, तुंगभद्रेला नेहमीं जी हंसते, गोदावरीला नेहमीं जी टोंचून बोलते अशा कावेरीच्या कांठीं तो मृकंडु मुनि पत्नीसहित आला. इंदीवरच ( कमल ) जिचे डोळे आहेत, कोकपक्षीच ( चक्रवाक ) जिचे स्तन आहेत कोमल अशा लाटाच जिचे हात आहेत, कवेर मुनीची मुलगी ह्मणून जी प्रसिद्ध आहे क्षीरसमुद्राची पत्नी जी आहे, तीच कावेरी होय. (३५) त्या कावेरीकांठावर राहणारे लोक तिचें पाणी पिऊन त्या पाण्याला अमृताची गोडी आहे असें वर्णन करतात, व त्या कावेरीच्या कांठावरचे रज अंगाला लाविले तर पातकें जळून जातात, असेंही सांगतात. (३६) तो मुनि तेथें पत्नीसहित शुद्ध होऊन प्रतिदिवशीं स्नानविधि कावेरींत उरकून घेऊन तप करावयास लागला. त्या कावेरीच्या कांठाजवळ पूर्णपणें सांनिध्यानें राहिलेला, मुनिजनांचें रक्षण करणारा श्वेतारण्याचा स्वामी अशा श्रीपशुपतीला वेदसंपन्न असा मुनि शरण गेला. लोकांच्या मनाला रंजन करणाऱ्या तेजस्वी त्या उमापतीची पूजा सर्व साधनांनीं करीत पुत्राकरितां तो मुनि तपश्चर्या करीत बसला. (३७) पुष्कळ कालपर्यंत कडक तप केलें तरी श्रीशिव जेव्हां प्रसन्न झाले नाहींत, तेव्हां तो तपस्वी मुनि आपलें तप उत्तरोत्तर ( पुढें पुढें ) वाढवूं लागला. (३८) तापसी लोकांमध्यें श्रेष्ठ असा तो मुनि जेव्हां अतिशय उग्र तप करूं लागला, तेव्हां विश्वपति विरूपाक्ष अंतरिक्षांत त्या मुनीला दिसले. (३९) त्रैगुण्याच्या ( सत्त्व रज तमाच्या ) पलीकडे असलेले, वेदरूप स्त्रीच्या भांगामध्यें मोत्याप्रमाणें चमकणारे उत्कृष्ट गुणांनीं

कम् ॥ उदारगुणमोंकारमंजूषामणिभूषणम् ॥३९॥ अखंडपारमैश्वर्यविश्रांतिमणिमंटपम् ॥ सर्वमंगलसौभाग्यसमुदायनिकेतनम् ॥४०॥ संसारविषमूर्च्छालुजीवसंजीवनौषधम् ॥ नित्यप्रकाशवैमल्यं कैवल्यसुरपादपदम् ॥४१॥ अनंतपरमानंदमकरंदमधुव्रतम् ॥ आत्मशक्तिलतोदंचत्प्रपंचाकारपल्लवम् ॥४२॥ ब्रह्मांडकुंडिकाषंडपिंडीकरणपंडितम् ॥ समस्तदेवताचक्रचक्रवर्तिनमद्वयम् ॥४३॥ तप्तचामीकरच्छायादायादद्युतिविग्रहम् ॥ माणिक्यमुकुटज्योतिर्मग्नमार्तंडमंडलम् ॥४४॥ चूडालं सोमकलया सुकुमारबिसाभया ॥ कल्याणपुष्पकलिकाकर्णपूरमनोहरम् ॥४५॥ मुग्धेतरेंदुसौंदर्यपरिपंथिमुखांबुजम् ॥ प्रातः संफुल्लकमलपर्यायत्रिविलोचनम् ॥४६॥ मंदस्मितमितालापमधुराधरपल्लवम् ॥ गण्डमण्डलपर्यंतक्रीडन्मकरकुण्डलम् ॥४७॥ कालिम्ना कालकूटस्य कण्ठनाले कलंकितम् ॥ आनाभिलंबिनीमेकां दधानं मौक्तिकावलिम् ॥४८॥ मणिकंकणकेयूरमाणिक्यस्तवकांकुरैः ॥ बाहुमंदारविटपैश्चतुर्भिः

---

युक्त असलेले, ओंकाररूप पेटींत मण्याप्रमाणें शोभणारे, (४०) अखंड परमेश्वर्याच्या विश्रांतीचा रत्नमंडप ह्मणवून घेणारे, सर्व मंगलकर सौभाग्याच्या समुदायाचें घर ह्मणवून घेतलेले, (४१) संसाररूप विषानें मूर्च्छा येऊन घाबरा होणाऱ्या जीवाला औषधासमान असलेले, नित्य प्रकाशानें निर्मळ असलेले, मोक्षरूप कल्पवृक्ष ह्मणवून घेतलेले, (४२) अपरिमित आनंदाच्या मकरंदाला भुंगा ह्मणवून घेणारे, आत्मशक्तिरूप वेलीपासून पल्लवाकृतीचा (पानाच्या आकृतीचा संसार उत्पन्न करणारे, (४३) अनेक ब्रह्मांडें एका ठिकाणीं गोळा करण्यांत पंडित असलेले, सर्व देवतारूप सामंत राजांना सार्वभौम ह्मणविणारे, दुसऱ्याच्या सहाय्याची इच्छा न करणारे, (४४) तापलेल्या सोन्याप्रमाणें सतेज शरीराचे, आपल्या डोक्यावरच्या रत्नमय किरीटांत कोट्यावधि सूर्यांना लपविलेले, (४५) सुकुमार कमलतंतूप्रमाणें तेजस्वी चंद्रकलेला मस्तकीं धारण केलेले, मंगलकर फुलांचें सुंदर कर्णपूर (कानांतले दागिने) घातलेले, (४६)आपल्या मुखतेजानें पौर्णिमेच्या चंद्राला लाजविणारे, प्रभातकालीं (पहांटेस) उमललेल्या कमलाप्रमाणें शोभणारे तीन डोळे असलेले, (४७) गोड अशा आपल्या ओठांतच मंदहास्य करणारे, गंडस्थलापर्यंत लोंबणारे कर्णकुंडल घातलेले, (४८) कालकूटाच्या पानानें काळा झालेल्या गळ्यानें सुशोभित दिसणारे, गळ्यापासून बेंबीपर्यंत लोंबणारी मोत्याची माळ घातलेले, (४९) मणिमय कंकणें व बाहुभूषणें, व माणि-

समलंकृतम् ॥४९॥ गौरीकुचतटामृष्टकुंकुमारुणवक्षसम् ॥ मृगटंकवराभीतिविलसत्करपल्लवम् ॥५०॥ तुष्टाव परितुष्टात्मा स्पष्टरोमांचकंचुकः ॥५१॥ मूलांकुराय जगतामभयंकराय मोहांधकाररवये कवये श्रुतीनाम् ॥ कैवल्यकल्पतरवे गुरवे गुरूणां कल्याणदाय वरदाय नमः शिवाय ॥५२॥ संसारदुस्तरमहार्णवकर्णधारसर्वोत्तरोत्तरविचित्रगुणैकसिंधो ॥ मायाविलासलवपल्लवितप्रपंचविस्तारणाय भवतेऽस्तु नमः शिवाय॥५३॥ स्वच्छन्दशक्त्यमृतपानसुखोत्तंरगस्वांताय शांतमनसां सुलभोदयाय॥ पारे स्थिताय तपसः श्रुतिसौधलीलापारावताय परमाय नमः शिवाय ॥५४॥ इति स्तुत्वा च नुत्वा च सोऽयं सोमविभूषणम् गेहिन्या सहजीविन्या भक्त्यैव स्तिमितोऽभवत् ॥५५॥ ऐश्वर्यलक्षणवतीमपि निर्विशंकामारंजितश्रुतिपथाममृतायमानाम् ॥ मंदस्मितां

---

क्याचे घोंस यांनीं सुभोभित झालेल्या व कल्पवृक्षाच्या शाखेप्रमाणें दिसणाऱ्या चार बाहूंनीं अलंकृत झालेले, (५०) गौरीच्या स्तनाच्या प्रांतभागाला किंचित स्पर्श केलेल्या व कुंकुमानें तांबडे दिसणाऱ्या वक्षस्थलानें सुंदर दिसणारे, मृग, टांकी, वरद, व अभय अशीं आयुधें घेतलेले (५१) अशा श्रीशिवाला पाहून ज्याच्या अंगावर रोमांच येऊं लागले त्या मुनीनें (मृकंडूनें) संतुष्ट होऊन स्तोत्र करावयास आरंभ केला. (५२) जगाच्या उत्पत्तीला मूलकारण झालेले, जगाला अभय देणारे, मोहरूप अंधाराला सूर्याप्रमाणें असलेले, श्रुतींला (वेदांला) कवि झालेले, (उत्पन्नकर्ते) मोक्षरूप कल्पवृक्ष असलेले, मोठ्यांमध्यें मोठे असलेले, मंगल देणारे, असा हे वरदा, शिवा, तुह्मास नमस्कार असो. (५३) संसाररूप महासमुद्रांतून तारणाऱ्या हे कर्णधारा (कोळ्या), सर्वांपेक्षां श्रेष्ठ असलेल्या गुणांच्या समुद्रा, मायेच्या विलासानें प्रपंच वाढविणाऱ्या देवा, शिवा, तुह्मांला नमन असो. (५४) स्वच्छंदशक्तिरूप (स्वेच्छाशक्तिरूप) अमृताच्या पानानें सुखयुक्त मन असलेल्या देवा, शांत मन असलेल्या सात्विक लोकांना सुलभपणें प्रकाशणाऱ्या देवा, तपश्चर्येच्या पलीकडच्या कांठावर असलेल्या देवा, वेदरूप सौधावर (दुमजल्यावर) आनंदानें खेळणाऱ्या पारव्या, हे श्रेष्ठशिवा, तुह्मांला नमन असो. (५५) याप्रमाणें आपल्या पत्नीसह त्या चंद्रशेखराचें स्तोत्र वारंवार भक्तीनें करून नमन करून तो मुनि स्वस्थ बसला. आणि त्या बरोबर सहजीविनी भार्याही स्वस्थ बसली. (५६) ऐश्वर्याचीं लक्षणें जींत पूर्णपणें भरलेलीं आहेत, व ऐकिल्याबरोबर शंका ह्मणून कधींही यावयाचीच नाहीं, व कानाला आ-

गिरमवोचदमंदभावां बालेंदुमौलिरवलोक्य मुनीश्वरं तम् ॥५६॥ प्रसन्नोऽस्मि तपोभिस्ते प्रार्थयस्व वरं मुने॥मत्प्रसादोऽहि जंतूनां मनीषितसुरद्रुमः ॥५७॥ ऐश्वर्यं धनदश्रियः प्रतिभटे यद्वादरो विद्यते वाणीवल्लभदुर्लभेऽपि यदि वा वैदुष्यसिंहासने॥भक्तानां परमास्पदे शिवपदे यद्वा मुने कथ्यतां कामं दातुमिहागतोऽस्मि तपसा कष्टेन तुष्टोऽस्म्यहम् ॥५८॥ गद्यम् ॥ इति स प्रसादसुभगमभिहितवति भगवति ततः प्रार्थयामास समीहितं वरमात्मनः ॥ पद्यम् ॥ फलांतरविकल्पनाविमुखमानसानां प्रभो भवद्भजनवासनानिधिरमीषु दारेषु नः ॥ ततोऽस्तु तनयोऽजसा तरुणचंद्रचूडामणे मनःकुमुदचंद्रमा मम यदि प्रसन्नो भवान् ॥५९॥ गद्यम् ॥ एवंवादिनि वेदवादिनि मुनौ स पुनरवादीचंद्रशिखामणिः सकलदेवताग्रामणीः षोडशवर्षदेशीय्यः श्रुतिपारदृश्वा सुतस्ते रोचते हतायुरथवा स मूढस्तयोरेकतरं दातुमिच्छा-

---

नंद देणारी, अमृताप्रमाणें गोड असलेली, मंदहासानें युक्त असलेली, अभिप्रायानें पूर्ण भरलेली अशी वाणी स्पष्टपणें काढून बालचंद्राला धारण केलेल्या श्रीशिवानें त्या मुनीश्वराला ह्मटलें. (५७) हे मुने, तुझ्या तपश्चर्येला मी प्रसन्न झालों आहें, माझ्यापासून वर मागून घे. माझा प्रसाद ह्मणजे प्राण्यांच्या मनांतलि इच्छा पूर्ण करणारा कल्पवृक्षच आहे. (५८) कुबेराच्या बरोबरीचें ऐश्वर्य मागावयाचें असेल, तर मागून घे. किंवा ब्रह्मदेवालाही जें दुर्लभ आहे, असें पांडित्य पाहिजे असेल तर माग, किंवा माझ्या भक्तांचें आश्रयस्थान असें शिवपद मागावयाचें असेल तर माग. अथवा हे मुने, तुझी इच्छा पूर्ण करण्याकरितांच मी येथें आलों आहें, आणि तुझ्या कठिण तपश्चर्येला मी संतुष्ट झालों आहें. (५९) याप्रमाणें प्रसन्नतेनें सुंदर वाक्यानें सांगितलेलें तें ईश्वराचें वचन ऐकून, नंतर आपल्या मनांतल्या इच्छेप्रमाणें तो मुनि ईश्वरास वर मागूं लागला. ईश्वरा, आपण मला जर प्रसंन अहांत तर इतर फलांची इच्छा न करणाऱ्या माझ्या या बायकोला (शीलवतीला) व मला हे चंद्रशेखरा प्रभो, माझ्या चित्तरूप कमलाला फुलविणारा जणूं चंद्रच असा आणि तुमच्या भजनांत तत्पर असणारा सुंदर मुलगा द्या. (६०) याप्रमाणें तो मुनि बोलत असतां पुनः सर्व देवांमध्यें श्रेष्ठ चंद्रशेखर श्रीशिव ह्मणाले कीं, भो मृकंडो, सोळा वर्षांच्या वयाचा वेदार्थ पूर्णपणें जाणणारा असा मुलगा तुला पाहिजे, किंवा शंभर वर्षें आयुष्य असलेला मूर्ख मुलगा पाहिजें या दोहोंत कोणता वर पाहिजे तो मी देण्यास सिद्ध आहें. याप्रमाणें ईश्वराचें

मि ॥ पद्यम् ॥ तदाकर्ण्य वचस्तस्य वैवर्ण्यं वदने वहन् ॥ आचष्ट काम-
नामिष्टामात्मनः सोऽष्टमूर्तये ॥६०॥ विद्याविहीना बहवोऽपि पुत्राः क-
ल्पायुषः संतु पितुः किमेतैः ॥ क्षयिष्णुना वाऽपि कलावतैव तस्य प्र-
मोदः शशिनेव सिंधोः॥६१॥वदनं साक्षरं पुंसां सदनं मंगलश्रियाम् ॥
अनक्षरमशिक्षाणामाननं पितृकाननम् ॥६२॥ ऐश्वर्यमप्रतिद्वंद्वं यशस्त्रै-
लोक्यभूषणम् ॥ विद्या वितनुते पुंसां किमन्यैर्गुणकीटकैः ॥६३॥ विद्या-
विहीनविप्रस्य विडंबाय गुणांतरम् ॥ परिधानविहीनस्य प्रतिकर्मांतरं
यथा ॥६४॥ निर्विद्यानां ब्राह्मणानां महत्वं निर्वीर्याणां क्षत्रियाणां प्रता-
पः ॥ नीरूपाणां कामिनीनां विलासो हासारंभं कस्य वा नो विधत्ते
॥६५॥ गद्यम् ॥ अतः स्वल्पायुषमपि श्रुतिपारदृश्वानं सुतं देहीति वि-
ज्ञापितः प्रज्ञावता तेन विज्ञाननिधिः पशुपतिरिति तमेव वरं प्रदाय मा-
यया सपरिवारस्तिरोहितोऽभूत् ॥ तिरोभूते भूतेश्वरे तादृशि स मुनि-

---

वचन ऐकिल्या बरोबर तो मुनि काळा ठिक्कर पडला. नंतर कष्टानें अष्टमूर्तीला आपल्या मनांतलें इष्ट (इच्छा) सांगूं) लागला. (६१) महाराज, विद्येनें हीन अशीं मूर्ख मुलें कल्पपर्यंत आयुष्याचीं असलीं तरी तसलीं मुलें बापाला घेऊन काय करावयाचीं आहेत. चंद्र हा कलावान क्षयरोगी आहे, तथापि समुद्राला तो मुलगाच चांगला आवडतो. (६२) पुरुषांच्या मुखांत अक्षरें असलीं तर मंगलकर संपत्तीचें घर असें तें मुख ह्मणवितें. अक्षर नसलेल्या मूर्ख लोकांच्या मुखाला स्मशान असें ह्मणतात. (६३) जोड नसलेलें ऐश्वर्य, त्रैलोक्याला भूषण असें यश, (कीर्ति) हे दोनी पदार्थ विद्येनें पुरुषास मिळतात. इतर किड्यासारखे असलेले हजारो गुण असले तरी त्यांचा काय उपयोग ? (६४) अंगावर वस्त्र न घेतां कर्में केलीं तर तीं कर्में जशीं व्यर्थ जातात, त्याप्रमाणें विद्येनें हीन असलेल्या ब्राह्मणाचे गुण समजावेत, ते गुण असले तरी केवळ विडंबनाकरितांच आहेत असें समजावें. (६५) विद्याहीन मूर्ख ब्राह्मणांनीं आपलें महत्व सांगितलें, किंवा पराक्रमानें हीन अशा क्षत्रियांनीं आपल्या प्रतापाचें वर्णन केलें, किंवा कुरूपी स्त्रियांनीं आपल्या विलासाचें वर्णन केलें तर हे सर्व जगांत कोणाच्या उपहासाला कारण होणार नाहींत? (६६) याकरितां प्रभो, आयुष्य थोडें असलें तरी चिंता नाहीं परंतु पूर्णपणें वेदार्थ जाणणारा असा मुलगा द्या. या प्रमाणें त्या बुद्धिमान मुनीचें वचन ऐकून विज्ञानाची खाण असे श्रीशिव त्याला तसा वर देऊन मायेसह परिवारासह अंतर्धान पावले. भूतपति ईश्वर स्वस्थानाला प्रयाण केल्यानंतर पत्नी-

रपि सदारः सपदि समुदितशोकामोदः संततपरिमथितसकलातिथिपरिश्रममाश्रममयासीत् ॥ ततोऽचिरेणैव कालेन सा वभूव दौहृदवती शीलवती ॥ प्रकाशमाने गर्भस्थे द्विजराजस्य तेजसि ॥ स्तनचक्रयुगं तस्या विवर्णमुखतां ययौ ॥६६॥ ॥गद्यं॥ सा खलु क्रमानुभूतसकलगर्भसंस्कारसनाथा स्वनाथानुभवसहिताभिर्वनदेवताभिः सानुग्रहनिखिलग्रहमालायां वेलायां शतमखहरिदिव चंद्रमसं सुतं सूतवती शीलवती ॥ पद्यम् ॥ जातेन तेन पुत्रेण सा वभौ मुनिवल्लभा ॥ रोचिष्मतेव रत्नेन रोहणाचलमेखला॥६७॥ तं पश्यतः समुचिते समयेऽभिजातं सौम्याकृतिं मुनिवरस्य तथा कुमारम् ॥ चक्षुश्चकोरयुगलं चरितार्थमासीत्कूलंकषोऽजनि मनः कुमुदप्रमोदः ॥६८॥ स च प्रदोषसमये जातत्वाद्बालचंद्रमाः ॥ पुपोष वपुषा भूयो यस्य कल्पेऽपि नक्षयः ॥६९॥ आदाय रक्षां स निजाग्निहोत्रादायुष्करैर्मंत्रशतैः प्रजप्ताम् ॥ फाले शिशोः प्रत्यहमाततान प्राभूद्यया तं न यमः प्रहर्तुम् ॥७०॥ स मृकंडो-

---

सहित मुनीला एकाच वेळेस दुःख झालें आणि आनंद झाला. नंतर ज्या आश्रमामध्यें अतिथींचा श्रमपरिहार नेहमीं होत होता, त्या आश्रमाला मुनि आला. पुढें लौकरच ती शीलवती गर्भिणी झाल्यामुळें तिला डोहाळे होऊं लागले तिच्या गर्भामध्यें ब्राह्मणश्रेष्ठाचें तेज जेव्हां चमकूं लागलें, तेव्हां शीलवतीचे स्तनाचे अग्रभाग हळु हळु काळे होऊं लागले. (६७) तेव्हां मुनीनें सीमंतोन्नयन वगैरे गर्भाचे संस्कार क्रमानें केले. पुढें आपापल्या पतीच्या सुखाचा अनुभव घेणाऱ्या वनदेवता सुप्रसन्न असतां व सर्व ग्रह सानुकूल असतां अशा वेळेस पूर्वदिशेनें चंद्राला जसें प्रसवावें याप्रमाणें शीलवती मुलाला प्रसवली यानंतर अतिशय तेजस्वी रत्नांनीं मेरुपर्वत जसा शोभावा, त्याप्रमाणें उत्पन्न झालेल्या त्या मुलाच्या योगानें शीलवती शोभली. (६८) योग्य समयाला उत्पन्न झालेल्या व सौम्य आकृतीच्या मुलाला पाहणाऱ्या त्या मृकंडु ऋषीचे दोन्ही डोळे कृतार्थ झाले व त्याला अतिशय आनंद झाला. (६९) वालचंद्राप्रमाणें शोभणारा तो मुलगा प्रदोषाच्या वेळेस झाल्यामुळें शरीरानें प्रतिदिवशीं वाढूं लागला. त्याचा नाश कल्पांतीं देखील झाला नाहीं, असें त्याचें आयुष्य श्रीशिवाचे कृपेनें वाढणार आहे. असा त्यांत गर्भितार्थ आहे. (७०) तेव्हां तो मृकंडु ऋषि आपल्या अग्निहोत्राचें भस्म घेऊन आयुष्य वर्धक शेंकडो मंत्रांनीं जप करून प्रतिदिवशीं मुलाच्या कपाळीं लावीत असे. त्यामुळें पुढें या मुलाला मारण्याचें धैर्य यमाला झालें नाहीं. (७१) मृकंडु ऋषीचे

रपत्यत्वान्मार्कंडेय इतीरितः ॥ तद्वत्सलैः समीपस्थैर्विद्वद्भिर्मुनिमंडलैः ॥७१॥ गद्यम् ॥ अथ तस्य पशुपतिवरादभ्यासायासमंतरेणापि प्रादुरासन्निरवद्याश्चतुर्दश विद्याः ॥ लोकाचार इत्युपनयनपूर्वमेव वेदादीनां विद्यानामुपदेशव्यपदेशं महर्षिरकार्षीत् ॥ पद्यम् ॥ चतुर्दशसु विद्यासु चातुर्यं परमीयुषः ॥ चतुर्दश समा यातास्तस्य सर्वार्थदर्शिनः ॥७२॥ गद्यम् ॥अथ कदाचिदर्धयामगामिन्यां यामिन्यां विरचितसावित्रीब्रह्मानुसंधानं विधिहुताग्निहोत्रं वीतिहोत्रमिवापरं विष्टरोपविष्टमंकांतिकोपविष्टेन मतिमता सविनयेन तनयेन विशदमुपन्यस्यमानां ब्रह्मविद्यामुपनिषद्विद्यामपि विहितकर्णमाकर्णयंतं मुनिवरं तं शीलवती निर्वेदवती प्रणम्येवमवादीत् ॥ पद्यम् ॥ वत्सरद्वयशेषासीद्वत्सस्यास्यायुषः कला ॥ वात्सल्यमात्रहृच्छल्यं भवद्भिः किं विधीयते ॥७३॥ पुत्रस्याल्पायुषः पूर्णा ये भवंत्युत्तमा गुणाः ॥ मातापित्रोश्च ते सर्वे मर्म-

---

स्नेही अशा सर्व विद्वान मुनींनीं जमून विचार केला कीं हा मुलगा मृकंडूचा मुलगा आहे त्यांत बापाचें नांवही लोकांच्या ऐकण्यांत यावें या करितां मुलाचें नांव मार्कंडेय असें ठेवावें असा विचार करून मार्कंडेय असें नांव सर्वांनीं मिळून ठेविलें. (७२) नंतर त्या मुलाला अभ्यास न करितांच श्रीपशुपतीच्या वराच्या प्रभावानें दोषरहित चौदा विद्या आपोआप अवगत झाल्या. परंतु लोकाचाराला अनुसरून उपनयनाच्या अगोदरच वेदादिविद्या शिकविण्यास महर्षीनें आरंभ केला. चौदाविद्यांमध्यें अत्युत्तम चातुर्य मिळविलेल्या व सर्वार्थांत पारंगत झालेल्या त्या मुलाच्या वयाला चौदा वर्षें झालीं. (७३) नंतर कोणे एके दिवशीं अर्धरात्रीच्या वेळेस सावित्री ब्रह्मानुसंधान ( गायित्रिमंत्राचा जप) उरकून घेऊन विधिपूर्वक अग्निहोत्र कर्म समाप्त करून दुसरा अग्नीच कीं काय ? याप्रमाणें दर्भासनावर बसलेला मृकंडुऋषि हा आपल्या मांडीजवळच बसून विनीत बुद्धिमान मुलगा मार्कंडेय ब्रह्मविद्येचा उपन्यास करीत होता व उपनिषदें सांगत होता तें ऐकत स्वस्थ बसलेला होता अशा आपल्या पतीला पाहून शीलवती त्याला (पतीला) नमस्कार करून वैराग्यानें बोलूं लागली. महाराज आपल्या मार्कंडेयाचें आयुष्य फक्त दोन वर्षांचें राहिलें. तर असें कां स्वस्थ बसलांत ? या मुलाच्या पाठीमागें केवळ पुत्रवात्सल्यानें घडोघडी मुलाची आठवण करीत; रडत बसावयाचें आहे काय ? (७४) महाराज, नकाहो असें स्वस्थ वसूं. कारण हें पहा मुलें चांगलीं

भेदकुठारकाः ॥७४॥ सैव भाग्यवती माता या पुत्रं चिरलालितम् ॥ प्रत्यक्षं भ्राम्यमाणाक्षं म्रियमाणं न पश्यति ॥७५॥ व्यालोलकुंडलयुगं विलसत्रिपुंड्रं मुग्धस्मितं श्रुतिसुगंधि मुखारविंदम् ॥ आलोकयामि कथमस्य कुलांकुरस्य प्राणात्यये परवशं परितापभिन्नम् ॥७६॥ विद्या- वित्तं वृत्तमौदार्यवीर्यं नीरोगत्वं निश्चला रूपसंपत् ॥ आयुः पूर्णं प्रार्थनीयं मनुष्यैस्तस्याभावे कस्य हेतोः प्रयासः ॥७७॥ गद्यम् ॥ इति सुतमरणचिंतासंतानज्वलितमनसि रुदत्यां शीलवत्यां स तापसोऽपि तपःसंपन्नः समीपगतं सुतं प्रबभाषे ॥पद्यम्॥ विद्याऽनवद्या विमलं चरित्रं रूपं च ते लोचनभागधेयम् ॥ आयुष्यमेकं लिखितुं ललाटे वामो विधिर्वत्स कथं बभूव ॥७८॥ प्रत्यक्षभूते परमेश्वरेऽपि वने निवासोऽपि सुरद्रुमाणाम् ॥ चिंतामणौ दीप्यति वा कराग्रे भाग्यानुरूपं फलमंगभा-

---

गुणवान असून लौकरच इहलोक सोडून गेलीं ह्मणजे पश्चात त्यांचे गुण आई. बापांचीं मर्मे तोडतात हो! (७५) महाराज, जिच्या पुढें कासाविशीनें मुलगा डोळे फिरवीत नाहीं, व जी पुष्कळ काळपर्यंत पोषण केलेल्या आपल्या मुलाचें मरण पाहत नाहीं, तीच खरी सौभाग्यवती आहे; असें ह्मणतात तें खोटें नाहीं हो! (७६) कानांत कर्णकुंडलें घातलीं आहेत, कपाळावर भस्माचे त्रिपुंड्र स्वच्छ दिसत आहेत, नेहमीं हंसत मुख आहे. भाषणें ऐकल्या बरोबर कानांना गोड वाटतात. असा गुणवान मुलगा मरणसमयीं परवश होऊन तळमळूं लागला तर तें मी कसें पाहूं हो? नका नका. (७७) विद्या, द्रव्य, उत्तम वर्तन, उदारता, पराक्रम, निरोगीपणा, सुंदर अढळरूप इतके गुण मागून घेतल्यानंतर पाठोपाठ पूर्ण आयुष्य मागून घ्यावयाचें होतें. पहा बरें त्या मुलाच्या पाठीमागें कोणासाठीं सायास करावेत? (७८) याप्रमाणें मुलाच्या मरणाच्या काळजीनें संताप होऊन शीलवती जेव्हां मोठमोठ्यानें रडूं लागली तेव्हां तपस्वी असा तो मुनि आपल्या मुलाला ह्मणाला. बाळा मार्कंडेया, तुझ्या कपाळीं निर्दोष विद्या, विमल चरित्र (वागणूक), डोळ्याला आनंद देणारें रूप इतके गुण लिहून शेवटीं पूर्ण आयुष्य एक लिहावयास तो विधि वांकडा कसा झाला रे? (७९) बाबा, तुझ्याकडे किंवा त्या विधीकडे तरी काय दोष आहे? कारण मीं तपश्चर्या केली त्यावेळेस परमेश्वर श्रीशिव प्रत्यक्ष झाले, नंदन वनासारख्या वनांत राहावयास मिळालें, परंतु सर्व कांहीं परमेश्वरानें दिलें तेवढें आयुष्य मात्र थोडेंच सांगितलें. हो? तेंही खरें आहे कीं हातांत चिंतामणि आहे परंतु आपल्या कपाळीं जितकें लिहलेलें असतें तित-

जाम् ॥७९॥ मुक्तिं न याचितः शंभुर्मुक्तिदोऽपत्यवांच्छया ॥ त्वं याचितः सुतोऽस्माभिर्न पूर्णोऽभून्मनोरथः॥८०॥वत्स तथोत्साहमावह वयमिह यथा भवद्दर्शनेन दुरंतशोकजलधौ न निमज्जामः इति पितुराकर्ण्य वचनं सवर्णी वाचमनीचभावामाचचक्षे ॥ पद्यम् ॥ मागाः शोकवशं तात मदपायानुचिंतया ॥ मृत्युं जयामि सहसा मृत्युंजयसपर्यया ॥८१॥ इति सपदि प्रतिज्ञाय पितुरनुज्ञामधिगम्य तमभिवंद्य सह जनन्या तामंतकविजयसाधनचिंतयैव यामिनीमपनीय प्रत्युषसि विरचितदिनमुखविधिरधिरोहति प्रथमगिरिशिखरसीमां भगवति त्रिभुवनतिमिरतिरस्करेऽहस्करे प्रशमितसकलजनपरिश्रमादाश्रमान्निर्गत्य दुर्गत्यपनोदनक्षममालक्षितपशुपतिप्रदोषतांडवं तांडवं नाम नगरस्थानपदमखिलविपदामपनोदनमुपागमत् ॥ पद्यम् ॥ स तत्र पत्रपुष्पाद्यैः शांकरं लिंगमर्चयन् ॥ मृत्युंजयपरां विद्यां प्रत्यहं पर्यशीलयत् ॥८२॥ त्रिसंध्यमाहितस्नानस्त्रिपुंड्रालंकृताननः ॥ त्रिभिर्दैवैरपि स्तुत्यं

---

केंच मिळतें जास्त कोठून मिळेल वरें ? (८०) मोठी कडक तपश्चर्या करून श्री शिवाला प्रसंन करून घेतलें परंतु प्रभु प्रत्यक्ष मोक्ष द्यावयास समर्थ असतां संततीच्या इच्छेनें तुला मागून घेतलें पण तेही आमचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत. (८१) याकरितां हे वत्सा, आह्मांला तुझ्यामुळें अपार दुःख कसें न होईल तसें कर. असें आपल्या पित्याचें वाक्य ऐकून सगर्भ सार्थ उदार अशा वाक्यानें आपल्या पित्याला त्या मार्कंडेयानें ह्मटलें कीं,— बाबा, आई, तुह्मी मला कांहीं अपाय होईल ह्मणून कां विनाकारण दुःख करितां ? हें पहा मृत्युंजयाची ( मरणाला जिंकिलेल्या परमेश्वराची ) सेवा करून मी मृत्यूला सहज जिंकितों. (८२) अशी तात्काळ प्रतिज्ञा करून पित्याची आज्ञा घेऊन पित्याला नमस्कार करून जननीला नमस्कार करून सारी रात्र अंतकाला कसें जिंकावें ? या काळजींत काढून दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस उठून नित्यकर्म उरकून घेऊन त्रिभुवनांतील अंधकार दूर करणारा भगवान सूर्य उदयाचलावर चढत असतांना, जेथें आलेल्या लोकांच्या श्रमाचा परिहार होत असे; त्या आश्रमापासून निघून जें नगर दुर्गतीला दूर झुगारून देत होतें, व प्रदोषकालीं श्रीशिव निरंतर जेथें नर्तनोत्सव करतात, व जेथें गेल्यावर सर्व दुःखें दूर होतात, अशा तांडव नांवाच्या नगरास तो मार्कंडेय आला. तो मुनि तेथें पत्रांनीं फुलांनीं श्रीशिवलिंगाची पूजा करूं लागला, व प्रतिदिवशीं मृत्युंजय मंत्राचा जप करूं लागला. (८३) तो मुनि

त्रिलोचनमपूजयत् ॥८३॥ गद्यम् ॥ तस्य खलु तादृशः शनैः समागतः कलिपतकालावसरस्य वासरः ॥ तत्र किल तत्संहरणाय कालः कतिचिद्चोदयदुद्ध(द्ध)टानात्मभटान्॥पद्यम् ॥ अद्राक्षुस्तं शिवासक्तं रुद्राक्षकृतभूषणम् ॥ मुद्राक्षरधरा मृत्योः क्षुद्रास्ते परिचारकाः ॥८४॥ गद्यम् ॥ तादृशं तमवलोकयतामंतककिंकराणामंतरेवं चिंता समभूत् ॥ अहो तापसकुमारस्य तपोमहिमा ॥यदिह संहर्तुमागतानामस्माकं सभंगमिव सर्वमप्यंगं न किंचिदपि चेष्टितुमुत्सहते ॥ केनापि कीलितमिव किमपि गदितुमपि न क्षमते जिव्हाकिसलयं सर्वथास्य संहरणे वयमपटव एव ॥ तदिदमस्मत्स्वामिने सकलं निवेदयामः ॥ इति सरभसमंतिकमंतकस्योपसृत्य तस्मै प्रणतिपूर्वं सर्वं वृत्तांतं अकथयन् ॥ पद्यम् ॥ स तेषां वचनं श्रुत्वा समवर्ती सविस्मयः ॥ सौम्यरूपं समादाय सहसा तं समासदत् ॥८५॥ गद्यम् ॥ कालोऽपि बालमपि

---

तेथें त्रिकाल स्नान करून त्रिपुंड्रांनीं सुशोभित होऊन तीनी देव ज्याची स्तुति करतात, त्या त्रिलोचनाची पूजा करूं लागला. (८४) याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर त्या मुनीचा ठरलेला दिवस हळु हळु जवळ जवळ येत चालला नंतर तेथें यमानें आपल्या उन्मत्त दूतांना आज्ञा देऊन मुनीला आणण्याकरितां पाठविलें. यमाची आज्ञा घेऊन जोंवर निघाले तोंवर तेथें येऊन श्रीशिवाच्या ठिकाणीं पूर्णपणें आसक्त झालेला, सर्वांगांवर रुद्राक्ष घातलेला, अशा मुनीला यमराजाचें चिन्ह धारण केलेले यमदूत पाहूं लागले. (८५) असें पाहत असतां त्या यमदूतांच्या मनांत मोठी काळजी उत्पन्न झाली. ते आपल्या मनांत ह्मणूं लागले कीं, काय आश्चर्य आहे पहा ! अहो या तापस्याच्या मुलाचें माहात्म्य काय सांगावें? आह्मी याला मारण्याकरितां आलों असून आमचीं सर्व अवयवें कांपावयास लागलीं आहेत आमचेच अवयव कांहींएक चेष्टा करीत नाहींत? आणि कोणी एकानें आमच्या जिभेला कुलूप लाविल्याप्रमाणें होऊन एक वाणी देखील आमच्या तोंडांतून निघत नाहीं. अर्थात आह्मी कांहीं या मार्कंडेयाला मारूं शकत नाहीं. यांत संशय नाहीं. याकरितां हें सर्व वर्तमान आमच्या प्रभूला सांगूं चला. असा आपसांत विचार करून मोठ्या वेगानें यमाजवळ येऊन त्याला नमस्कार करून त्यांनीं सर्व हकीकत सांगितली. याप्रमाणें आपले दूतांचें ह्मणणें ऐकून तो यम मनांत चकित झाला. नंतर साधारण सौम्यरूप घेऊन त्या मार्कंडेयाजवळ स्वतः यम आपणच आला. (८६) परंतु तेथें येऊन पाहतो तर एवढा

तमालोकयन् मनस्येवमवर्णयत् ॥ पद्यम् ॥ बध्द्वा पिंगजटं शिरो विमलया भूत्या त्रिपुंड्रं मुखे वक्षःसीम्नि भुजद्वये च रचितं वासो नवं वल्कलम् ॥ रुद्राक्षाभरणैर्वपुः कवचितं रुद्रे विनिद्रं मनो जिव्हा चास्य मनौ स्थिता शिवपरे श्रेयानसौ तापसः ॥८६॥ अस्य सर्वपरिभाविभावतो भीतिमावहति मेऽपि मानसम् ॥ शंकराश्रितमिमं समागतः किं करोतु मम किंकरो जनः ॥८७॥ यदागमनिमित्तानि दुर्निमित्तानि देहिनाम् ॥ तस्य मे क्व भयं किंवा स्पंदते वामलोचनम् ॥८८॥ भयाय नः संततमेव जायते भवाश्रितानां सविधोपसर्पणम् ॥ अशेषपापापहृतौ पटीयसी बलीयसी भक्तिकलापि शांकरी ॥८९॥ रुद्राक्षदाम शिरसि स्फुटमुत्तमांगे रुद्राक्षरप्रशमनं भसितं ललाटे ॥ यस्यास्ति तं नियमितुं पटवो न देवा ब्रह्मादयो बहुतृणं हि कुतो मनुष्याः ॥९०॥ गद्यम् ॥ सर्वथा शिवपरायणोऽयं महानुभावः सबहुमानमाकारयितव्यः पाशा-

---

कृतांत काळ खरा, तो देखील आपल्या मनामध्यें विचार करूं लागला. काय आश्चर्य आहे पाहा डोक्यावर लाल जटा काय आवळून बांधिल्या आहेत ? कपाळावर विभूतीचे त्रिपुंड्र काय लाविले आहेत, उरावर दोन्ही भुजांवर विभूतीचे पट्टे काय ओढिले आहेत, नवीन ताजें वल्कल काय नेसला आहे, सगळ्या अंगावर रुद्राक्ष काय घातले आहेत, श्रीशिवाच्या ठिकाणीं मन काय तल्लीन केलें आहे, जिभेनें शिवपर पंचाक्षरी मंत्र काय पुटपुटतो आहे, एकूण हा तापसकुमार श्रेष्ठ आहे खरा. (८७) एकंदरींत सर्वतोपरी विचार केला तर याला धरण्यास मला देखील भीति वाटते, अशा शिवभक्त कुमारापुढें माझ्या दूतांचें काय चालेल ? (८८) प्राण्यांना अपशकुन काय होतात, ते कांहीं तरी पुढें येणाऱ्या विपत्तीला दाखवितात, तर आज माझा डावा डोळा लवतो आहे, तर कोठून केव्हां मला भीति येते कीं काय असें वाटूं लागलें आहे. (८९) केव्हांही मी पाहतों तर शिवभक्तांजवळ आल्याबरोबर नेहमीं भयच वाटतें. यावरून श्रीशिवाची भक्ति सर्व पातकांचा संहार करण्यांत समर्थ आहे असें ठरतें. (९०) डोक्यावर रुद्राक्षांची माळ ज्यानें बांधिली आहे, नशीबीं लिहिलेलीं भयंकर अक्षरें साफ पुसणारें भस्म ज्यानें कपाळीं लाविलें आहे, अशा शिवभक्त मानवाला शासन करणें ब्रह्मादि देवांकडून होत नाहीं तर मनुष्यें काय शासन करतील. (९१) तर हा मुनि शिवाच्या ठिकाणीं असक्त असल्यामुळें महासमर्थ आहे खरा. याकरितां याला कठोर बोलून उपयोग नाहीं, बहुमानानेंच याचा सत्कार केला पाहिजे.

दिनिर्बंधानामन्य एव हि भाजनम् ॥ इति बहुधा संचिंत्य तमंत्यदशापन्नं सबहुमानमाकारयदंतको मंदकोलाहलः ॥ पद्यम् ॥ मार्कण्डेय महाभाग माहेश्वरशिखामणे ॥ संप्राप्तस्तव कालोऽयं समागच्छाहमंतकः ॥९१॥ महेश्वराराधनकर्मणा ते मृकंडुसूनो विगतान्यघानि ॥ मल्लोकमार्गेण मयादृतः सन् माहेश्वरं स्थानमुपेष्यसि त्वम्॥९२॥ गद्यम्॥ इति सविनयमाहूतः स मुनिः प्रेतपतिना किमिदमिति दिक्षु निक्षिप्तचक्षुरंतिकगतमंतकं रौद्राकारमद्राक्षीत् ॥ स तदा पितृवचनस्मरणेन पितृपतिमेव तमवधार्य सविनयं सधैर्यं सभयं सविस्मयं च प्रत्यवादीत् ॥ पद्यम् ॥ समस्तप्राणिसंहारमहासवनदीक्षितम् ॥ समवर्तिनमायांतं काल त्वामभिवादये ॥९३॥ नास्था मे शंकरस्थाने नासने मौरशासने ॥ स्पृहयामि सदा भूमौ पितृशुश्रूषणोत्सवम् ॥९४॥ कृत्वा तपांसि सुतरां कृशविग्रहाभ्यां लब्धोऽहमेक इति शंकरतः पितृभ्याम्॥ ताभ्यां न किंचिदुपकारकलां विधाय गंतुं तवाद्य सविधे यम किंनु

---

माझ्या पाशांनीं बांधावयास हा कांहीं पात्र नाहीं त्याला दुसराच मनुष्य लागतो. याप्रमाणें पुष्कळ विचार करून शेवटच्या अवस्थेला पावलेल्या त्या मुनीचा सत्कार सौम्यस्वरानें तो यम करूं लागला. भो मार्कंडेया, महाभागा, माहेश्वर श्रेष्ठा, तुझा शेवटचा काल जवळ आला आहे, ह्मणून हा मी यम तुला नेण्याकरितां आलों आहे. (९२) भो मार्कंडेया, श्रीशिवाची आराधना करून तुझीं पातकें सगळीं जळलीं आहेत, याकरितां माझ्या लोकाला येऊन तेथें सत्कार घेऊन तेथूनच पुढें माहेश्वरस्थानाला ( कैलासाला ) जा. (९३) याप्रमाणें विनयपूर्वक बोललेलें यमाचें वाक्य ऐकून काय हें आहे ? कोण बोलतें हें ? अशा कावऱ्याबावऱ्या दृष्टीनें तो मार्कंडेय चारी दिशेकडे पाहूं लागला, तितक्यांत अगदीं आपल्याजवळच येऊन उभा राहिलेल्या भयंकरस्वरूपी अंतकाला मुनीनें पाहिलें. तेव्हां आपल्या पित्यानें बोललेलें आठवून हाच यम आहे असा निश्चय करून विनयानें व धैर्यानें त्याला तो मुनि आश्चर्यमुद्रेनें बोलला. सर्व प्राण्यांचा संहार करण्याविषयीं दीक्षा घेऊन बसलेल्या हे काला, तुला मी नमस्कार करितों. (९४) भो यमा, मला श्रीशंकराचें स्थान नको, आणि मला श्रीविष्णूचें स्थानही नको. या भूलोकांत राहून नेहमीं पित्याची सेवा करावी या इच्छेशिवाय दुसरी इच्छा नाहीं. (९५) आपलें शरीर कृश करून उग्रतप करून श्रीशिवापासून माझ्या पित्यानें मला मिळविलें, असें असून मातापित्यांचा थोडा देखील उतराई न होतां हे

धर्मः ॥९५॥ गद्यं ॥ इति गदितवति विनयवति मुनिसुते व्याजहार स पुनः ॥सविनयावलेपं सविधवर्ती समवर्ती शृणु बहुश्रुत श्रोत्रियकुमार ॥ पद्यम् ॥ नेच्छंति सर्वे निधनं विरूढास्ताते जनन्यां तनयादिके वा ॥ प्राणापहारी सकलप्रजानां कालः क्षणं न क्षमते कठोरः ॥९६॥ प्राप्तकालं न मुंचामि भवादृशमहं क्वचित् ॥ ममाधिकारमुद्रेयं महेश्वरनियोजिता ॥९७॥ अपायमन्यं हरति प्रजानामुपाययोगो नच कालमृत्युम् ॥ छत्रं धृतं वृष्टिनिवारणाय दंभोलिपातं च कथं निरुंधेत् ॥९८॥ तटिदंकुरभंगुरं शरीरं समुपैति स्थिरतां न जातु यत्नैः ॥ भवति स्थिर एव कीलितः सन् पटलप्रांतनिपाततोयबिंदुः ॥९९॥ क्षणिकानां शरीराणां स्थिरीकरणसाधनम् ॥ स्थित्यै बुद्बुदजालानामाधारस्तंभयोजना ॥१००॥ शक्येषु यत्नः कर्तव्यो नाशक्येषु कदाचन ॥ किं शिलाभ

---

अंतका, इतक्यांतच तुझ्याजवळ मीं यावें हा जगांत धर्म होईल काय ? ( ही न्यायाची गोष्ट होईल काय ? ) (९६) विनयशील मुनि याप्रमाणें बोलत असतां जवळ असलेला तो यम पुनः विनयानें ह्मणाला भो बहुश्रुता, श्रोत्रिया, मुनिकुमारा, मी बोलतों, तें ऐक. जगांत आई, बाप मुलें यांच्या मायेनें गुरफटलेले लोक आपोआप मरणाची इच्छा करतील काय ? याकरितां तात असो, माता असो, मुलगा असो. प्राणाचा अपहार करणाऱ्या कठोर यमाला कोणाचीही एक क्षणभर देखील कींव येत नाहीं. (९७) कोणाची काय वेळ आलेली असते त्याला मी सोडीत नसतो ह्मणून मी तुलाही सोडीत नाहीं. असा हा अधिकार साक्षात श्रीशिवानेंच मला दिला आहे. (९८) बाबा मार्कंडेया, प्रजेचे अपाय ( इतर रोग ) काय असतील, त्यांचें निवारण उपायांनीं होत असतें, तेंच कालमृत्यूचें निवारण होणार नाहीं. पावसाचें पाणी लागूं नये. ह्मणून छत्रीचा उपयोग होतो पण ती छत्री वीज कडाडली तर तिचा वेग आवरूं शकेल काय? (९९) विजेप्रमाणें क्षणिक असलेलें शरीर कोणत्याही उपायांनीं स्थिर ( चिरकाल ) राहत नाहीं. पटलाच्या प्रांतभागावरून (पाणपट्टीवरून) पडलेले उदकाचे बिंदु कुलुपांत ठेविले तर ते स्थिर राहूं शकतील काय? (१००) क्षणिक शरीरें स्थिर राहवयाकरितां उदकाच्या बुडबुड्याचा खांब आधाराकरितां खालीं दिला तर कदाचित स्थिर राहूं शकेल ? (१०१) कोणतीही गोष्ट साधावयास योग्य असेल तर तिच्याविषयीं वाटेल ते प्रयत्न करावेत, अशक्य गोष्टीविषयीं माणसानें कधींही यत्न करूं नये. मधुपान करणाऱ्या भुंग्यानें दगड खाण्याची कधीं इच्छा

क्षणाकांक्षी मधुपायी मधुव्रतः ॥१०१॥ कालतंत्रे जगत्तंत्रे तस्य स्वातंत्र्यमिष्यते ॥ सुखाप्तौ दुःखहानौ वा विना सर्वज्ञमीश्वरम् ॥१०२॥ ब्रह्मा विष्णुदिने याति विष्णू रुद्रस्य वासरे॥ईश्वरस्य तथा सोऽपि कः कालं लंघितुं क्षमः ॥१०३॥ ब्रह्मादीनामशक्येऽर्थे वृथा किं यतते भवान् ॥ कुलिशस्यापि दुर्भेद्ये कुत्र तिष्ठति सूचिका ॥१०४॥ जात्यायुर्भोगवैषम्यसंपादनपटीयसी ॥ कर्ममूला हि जंतूनां कंठस्था लोहशृंखला ॥१०५॥ कालचक्रघटीयंत्रे कर्मपाशावलंबिनाम् ॥ एकांतता न वसतेरिहामुत्रापि देहिनाम् ॥१०६॥ मुनिनंदन मोहस्य नावकाशः प्रदीयताम् ॥ पंचत्वं प्रकृतिं मत्वा मुंच त्वं देहकंचुकम्॥१०७॥ प्राज्ञो विमूढहृदयः प्रभुरप्रभुर्वा बालो युवेति गणना नहि नः सभायाम् ॥ मध्यस्थभावमवलंब्य वयं हरामो भूतानि कर्मपरिपाकवशो हि मृत्युः ॥१०८॥ गघम् ॥ किमालापकालापनयनेन किं कर्मजिव्हालकालवेताळ एव सर्व-

---

केली आहे काय ? (१०२) कालाचें अधीन असलेल्या या जगाला सुखप्राप्तीविषयीं व दुःख घालविण्याविषयीं एका सर्वज्ञ ईश्वराशिवाय स्वातंत्र्य कधीं मिळालें आहे काय ? (१०३) ब्रह्मदेव हा विष्णूचा एक दिवस संपल्यावरोबर जातो, विष्णु हा रुद्राचा एक दिवस संपल्यावरोबर जातो, रुद्र ईश्वराच्या एका दिवसांत जातो, तर त्या ईश्वराचा काल मोडण्यास कोण समर्थ आहे वरें ? (१०४) ब्रह्मादिदेवांलाही जी गोष्ट साध्य नाहीं तिच्याविषयीं तूं विनाकारण कां प्रयत्न करतोस. जें वज्रानें फुटत नाहीं, त्याच्या ठिकाणीं सुईचा उपयोग होईल काय ? (१०५) आयुष्य आणि भोग यांचें वैषम्य मिळविणारीं लोखंडाची बेडी जी प्राण्यांच्या गळ्यांत पडली आहे, ती कर्ममूलक आहे. (१०६) कालपाशाच्या रहाटगाडग्यांत कर्मपाशांनीं अडकलेल्या प्राण्यांना स्थिरता यालोकीं मिळत नाहीं आणि परलोकींही मिळत नाहीं. (१०७) भो मुनिकुमारा, मोहाला आवकाश देऊं नकोस. मरण हें स्वभावसिध्द असून कधींही चुकत नाहीं. असें समजून हें तुझें शरीर लौकर सोड चल. (१०८) मूर्ख असो, बुद्धिमान असो, प्रभु असो, तरुण असो, आमच्या सभेंत कोणाचीही गणना नाहीं. आह्मी मध्यस्थ भावाचें अवलंबन करून ( सर्वांवर सारखी दृष्टि ठेवून ) प्राण्यांना नेत असतों. मृत्यु हा कर्मांच्या स्वाधीन आहे. (१०९) विनाकारण काळ घालविण्यांत काय अर्थ आहे? आपल्या कर्माला अनुसरून येणारा काळ हाच घातुक आहे, असा विचार क-

जनघातुक इति संचिंत्य मद्वशवर्ती भवतु भवान्महानुभावः ॥ इति मार्कंडेयं बहुमानधारामाक्रम्य गदितवति सविनयं मुनिसुतसर्वगर्वकंडूलवचनदंडधरे दंडधरे किंचिदिव मुकुलितमुखकांतिर्मुनिनंदनो मनसैवमचिंतयत् ॥ सर्वथा शतकृत्वः प्रस्तुतेनापि पादप्रणामेन स्तुतिवचसा दीनोदाहरणेन वा न निवर्तते कालमृत्युः ॥ नचोपायांतरमन्वेषयितुमवकाशः किंकरोमि किमुत्तरमालपामि किमाश्रयामि कस्मै कथयामि नान्यं पश्यामि सहायं केवलं गलग्राही कृतांत एव पुरोऽवतिष्ठते ॥ पद्यम् ॥ किं विद्ययांतिमे काले किं करोति भिषग्वरः ॥ किं तातेन जनन्या वा धनेन सुहृदाऽपि वा ॥१०९॥ गद्यम् ॥ महाभयादीदृशात्परित्रातुं न कोऽपि क्षमते अथवा किमिष्टदेवतया वा प्रयोजनं महत्यामपि विपदि न सन्निधत्ते हा कृतघ्नोऽस्मि पितृविषये हा तात निष्फलं पुण्येतरस्य मम कृते कृतं तपः हा मातः पादयोस्ते प्र-

---

रून माझ्या ताब्यांत महानुभाव असा तूं लौकर ये. याप्रमाणें बहुमानपूर्वक विनयानें बोलत असतां आपल्या गर्वाचें खंडन करण्याकरितांच दंड धारण केलें कीं, काय असें दिसणाऱ्या त्या यमाला पाहून मार्कंडेयाचें तोंड किंचित् उतरलें. त्यामुळें त्यानें आपल्या मनांत विचार केला कीं,—आतां या यमापुढें हजारों तऱ्हेचीं प्रास्ताविक भाषणें केलीं, किंवा शेंकडो नमस्कार याला घातले, किंवा याची अपार स्तुति केली, किंवा हजारो दीनांचीं उदाहरणें दिलीं तथापि हा कालमृत्यु परत जात नाहीं एवढा निश्चय झाला. अथवा दुसरा उपाय शोधावयास वेळ आहे ह्मणावें तर तेंही नाहीं, तर यावेळेस काय करूं? काय उत्तर याला देऊं, कोणाच्या गळ्यांत जाऊन पडूं, कोणाला सांगूं, आतां दुसरा कोण सहाय करावयास येईल बरें ? केवळ गळफांस चढवावयास हा यम तयार होऊन पुढें उभा राहिला आहे. असा शेवटचा काल आला ह्मणजे विद्या काय करिते? वैद्य काय करूं शकतो? जनक असून काय करणार? जननी असून काय करणार? धन काय करूं शकेल? मित्र काय करणार? (११०) अशा मोठ्या प्रसंगांतून पार पाडावयास कोणीही समर्थ होत नाहीं. अशा वेळेस या इष्टदेवतेला तरी घेऊन काय करावयाचें आहे? कारण इतकें तप करून अशा प्रसंगीं देखील प्रसन्न होत नाहीं. हाय हाय माझ्या पित्याला मी कृतघ्न झालों काय? हाय हाय बाबा, पाप्याचें सर्व कांहीं निष्फल आहे बरें. पाप्याकरितां तुह्मी तप केलें हो. आई तुला

णमामि हा तनयस्य मे मातृतया मनसि ते निरवधिः क्लेशजलधिरुपस्थापितः कः कालजयोपायः स्वस्ति तपसे यदिदानीमापदुत्तारणेन क्षमं नमः श्रुतिस्मृतीतिहासपुराणादिभ्यः यदुपदिष्टो धर्मः कर्तारमापदो रक्षितुं न क्षमते ॥ पद्यम् ॥स्वाचारो न मया व्यलंघि मनसा स्मृत्यादिसंचोदितो नालस्यादिभिराहितं ननु पदं मार्गे निषिद्धे मया॥ मात्रा वा जनकेन वा निगदितं स्वप्नेऽपि नोपेक्षितं किंचिन्नाचरितो महत्स्वविनयः किं वापमृत्योर्बलम् ॥११०॥ नाश्रोत्रियगृहे भुक्तं न वाचा भर्त्सितो गुरुः ॥ न संध्यासु मयाधीतं किमायुःक्षयकारणम् ॥१११॥ धर्मोपदेष्टा सकलस्य तातः पतिव्रतानां प्रथमा च माता ॥ तत्संततेर्नः समुपागतोऽयमकालमृत्युर्हत एव धर्मः ॥११२॥ विच्छिन्नो नु विभूतिधारणविधिर्विद्या नु चौर्याहृता सुप्तं किं ह्युदये तथास्तसमये स्वैरं

---

मी नमस्कार करितों. हाय हाय तूं माझी झालीस ह्मणून माझ्याकरितां तुला अपरंपार दुःख होईल ना ? या काळाला जिंकण्यास उपाय कोणता राहिला ; या माझ्या तपाला आतां मी हात जोडतों पुरे पुरे. कारण अशा संकटाच्या वेळेस देखील माझा उद्धार करावयास समर्थ झालें नाहीं अशा तपाला काय करावयाचें आहे ? श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणें यांना दुरून नमस्कार असो. कारण यांमध्यें सांगितलेला धर्म कर्त्याला ( त्याप्रमाणें आचरण करणाऱ्याला ) संकटापासून सोडवीत नाहीं. पहा वरें, स्मृत्युक्त स्वधर्मापासून मनानें देखील मी भ्रष्ट झालें नाहीं, आळसानें एक दिवस निषिद्ध मार्गांत मीं पाऊल ठेविलें नाहीं. आईबापांची आज्ञा स्वप्नांत देखील मोडली नाहीं, मोठे लोकांचा अपमान केला नाहीं असें असून हा अपमृत्यु माझ्या पाठीमागें लागला आहे, काय याचें सामर्थ्य आहे पहा. (१११) अश्रोत्रियाच्या घरीं जेवलों नाहीं, वाणीनें गुरूची निंदा केली नाहीं, संध्यासमयीं अध्ययन केलें नाहीं, असें असून आयुष्य क्षीण व्हावयास काय कारण असेल तें कळत नाहीं. (११२) सगळ्या जगाला धर्माचा उपदेश करणारा माझा बाप आहे. पतिव्रतास्त्रियांमध्यें अग्रेसर अशी माझी आई आहे. अशांच्या पोटीं उत्पन्न झालेल्या मला अकालमृत्यु आला ह्मणजे जगांतला धर्मच बुडाला ह्मणावें. याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. (११३) विधिपूर्वक विभूति धारण करण्यांत चुकलों असेन काय ? अथवा विद्या चोरून मिळविली काय ? अथवा सकाळीं संध्याकाळीं स्वैरपणें निजलों काय ? किंवा श्रीशिवाला

सहस्रद्युतेः ॥ किं वालंघि शिवालयः पशुपतिर्गर्वादकृत्वा नतिं केनासीदपमृत्युसंकटविधिः किंचिन्न जानीमहे ॥११३॥ गद्यम् ॥ हंत मंदपुण्यानां प्रबलाश्रयोऽपि विफलायते ॥ भृशं यदिह महतीं देवतामाश्रित्यापि विपत्तमसि निमज्जामः अथवा प्रणतार्तिहरो हर इति प्रशंसापटहः पौराणिकानामाकर्ण्यते ॥ सर्वथा मामाश्रितमापद्गतं विरूपाक्षो नोपेक्षते ॥ तदिह धैर्यवता मया भवितव्यम् ॥ विपदि धैर्यमिति महतामादेशः ॥ अथेदानीं शिवभक्तिबलावलंबेन सोद्धतिं वचनपद्धतिमवतार्य कालयापनमुपपादयिष्यामि ॥ शुभेतरस्य कालहरणं पथ्यमिति तथ्यवादिनां खल्वादेशः ॥ इति मनसि चिंतासंततिमवगाह्य पशुपतौ निश्चलमतिरपश्चिमया वाचा धीरधीरंतकमाचचक्षे ॥ अये दंडधर कालतंत्रं जगत्तंत्रमिति न मृषोद्या भारती सर्वसाधारणोऽयं न पंथाः ॥ पद्यम् ॥ बहुश्रुतानां भवमाश्रितानां न कालपाशो नहने प्रवीणः॥ विशृंखलानां विसशृंखला किं गंधद्विपानां गमनं निरुंधेत् ॥११४॥

---

गर्वानें नमस्कार न करितां शिवालय ओलांडिलें असेल काय? कोणत्या कारणानें माझ्यावर हें अपमृत्यूचें संकट आलें हें कळत नाहीं. (११४) जे मूळचे पापी आहेत त्यांनीं कसल्याही मोठ्यांचा आश्रय केला तरी तें व्यर्थच जातें. कारण हें पहा, सर्व देवांमध्यें श्रेष्ठ देव अशा महादेवाचा आश्रय मीं केला तरी या विपत्तींत पडण्याचा प्रसंग मला आला ना? अथवा शरण गेलेल्या लोकांचीं संकटें हरण करणारा हर आहे ह्मणून नगाऱ्यासारखे पौराणिक लोक ओरडतात. हें सगळ्यांनीं ऐकिलें आहे. यावरून त्याचा आश्रय केलेल्या माझी उपेक्षा तो विरूपाक्ष कधींही करणार नाहीं याकरितां धैर्य धरावें हेंच खरें, आणि संकटावस्थेंत धैर्य धरावें असा उपदेश मोठमोठ्यांचा आहे. आतां यावेळेस श्रीशिवभक्तीच्या जोरावर उद्धटपणाचें वर्तन करून या यमाला दूर झुगारून देतों. आणि अमंगलाला कालहरण करणें पथ्यकर आहे असा मोठमोठ्यांचा उपदेश आहे. याप्रमाणें मनांत अनेक कल्पना करून शेवटीं पशुपतीच्या ठिकाणीं निश्चल भाव ठेवून खड्यावाणीनें नेटानें त्या अंतकाला तो मुनि ह्मणाला. अरे यमा, हें जग कालाचे ताब्यांत आहे ह्मणून तूं ह्मणालास परंतु ही गोष्ट सगळ्यांना लागूं पडत नाहीं बहुश्रुत श्रीशिवभक्त लोकांना स्वच्छंदपणें नेण्यास कालपाश समर्थ नाहीं मदोन्मत्त हत्तीच्या बेड्या तुटून पडल्या ह्मणजे कमलाच्या तंतूनें त्या हत्तीचा वेग आवरेल

पशुपतिपदभाजिनां जनानां न भवति पापकलंकसंगशंका ॥ दिनकर-रथवाजिनां कथं वा तिमिरततेश्च तिरस्क्रियाप्रसंगः ॥११५॥ कालस्य वा न गणना कमलासनादेर्मृत्युस्स्मृतेरविषया विधयोऽप्यगण्याः॥ का कामना सकलकामशिरोगतानां शंकापदं किमिह शंकरकिंकराणाम् ॥११६॥ कालवालभुजंग त्वं नालमाक्रमणाय नः ॥ मच्चित्तगृहमध्यास्ते विषहारी भिषग्वरः ॥११७॥ इति तापसडिंभस्य दंभोक्त्या स विडंबितो बभूव स्थिर एवाग्रे मृत्युरत्युग्रविग्रहः ॥११८॥ गद्यम् ॥ अथ तमंजनधरिणीधरपुंजसहस्रकोटिभिरिव घटितवपुषं पटुतरमहादहनविपुलज्वालामालानुकरणनिपुणोर्ध्वविलसदुत्कटजटाच्छटाविद्युतितेन ज्वलितक्रोधानुवेधघूर्णमानविकटनयनपुटविवरनिर्यदनूनकणगणालातपातभयंकरेण हुंकाररूषितशंकरगिरेः कूटस्थपुटरदनकोटिवि-

---

काय ? (११५) श्रीपशुपतीच्या पदकमलांत तल्लीन झालेल्या लोकांना पापरूप कलंकाचा संपर्क होईल अशी शंका घेणें नकोच आहे. कारण सूर्याचा रथ वेगानें धांवत असतां अंधाराचा लेळ जरी पुढें आला तरी त्याच्यानें रथाचा तिरस्कार करणें होईल काय ? (११६) कालाला ब्रह्मादिदेवांची गणना नसेल, आणि त्यांना मृत्यूचें स्मरणही होत नसेल, त्याचप्रमाणें हजारो विधि जगांत उत्पन्न होत असतील मरत असतील हें सर्व आह्मांस कबूल आहे. परंतु सर्व वासनांच्या पलीकडे गेलेल्या लोकांच्या मनांत वासना ( इच्छा ) काय राहणार आहे ? अशा शिवभक्तांच्या मनांत संशय तरी कशाचा येणार आहे ? (११७) भो काळरूपी भुजंगा, ( मोठ्या सर्पा,) आह्मा सारख्यांना आक्रमण करावयास तूं समर्थ नाहींस. कारण माझ्या चित्तरूप मंदिरामध्यें तुझ्या सारख्याचें विष घालविणारा महावैद्य बसला आहे समजलास ? (११८) याप्रमाणें त्या तापसकुमाराचें दंभाचें ( गर्वाचें ) बोलणें ऐकून, आश्चर्यचकित होऊन अत्युग्र शरीराचा तो यम त्याच्यापुढें तटस्थ होऊन राहिला. (११९) हजारो कोट्यावधि काजळाचे पर्वत एकवटून एक शरीर तयार झालें आहे कीं काय ? याप्रमाणें काळेंकुट्ट शरीर असलेला भयंकर आगीचा लोळच चहूंकडे पसरलेला आहे कीं काय ? अशा तांबड्या लाल जटांच्या प्रकाशानें चमकणाऱ्या, व प्रज्वलित झालेल्या क्रोधाग्नीमुळें ( अतिशय संतापामुळें ) उतू आलेल्या डोळ्यांतून ठिणग्या पडत असल्यामुळें भयंकर दिसणाऱ्या, आणि हुंकारानें झुगारलेल्या पर्वताच्या शृंगाप्रमाणें ( सुळक्याप्रमाणें ) असलेल्या

घट्टनकटंकटरटितारंभदंभोलिघोषभीषणेन निरवग्रहविग्रहविजृंभमाणघनघर्मजलस्थूलबिंदुसंदोहवर्षवर्षेण निजतनुनीलिमघनाघनघटाडंबरेण प्रलयारंभमिव विजृंभयंतं उद्भटललाटविघट्टितेन विशंकटविलोचनजलधिकुहरजनितक्रोधलक्ष्मीविजयतोरणविभ्रमेण भ्रुकुटिकेनोपलक्षितं उद्दामरदनमंडलमखंडलंबितविविधनरमुंडषंडगणतांडवभयानकमहत्तरोरःशिलापट्टमट्टहासविघट्टितमुखविवरवल्मीककुहरसमुन्मीलितचंचलजिव्हाद्विजिव्हावलीपरिश्लिष्टया निष्ठुरविशंकटदंष्ट्रांकुरप्रोतप्रेतशतसहस्रनिष्ठ्यूतया पृथुलतरभुजगिरिशिखरनिर्झरायमानया स्वरुचिघननिचयप्रचुरसंध्यारागपरंपरया नवरुधिरधारया सकलभुवनसंहाराधिपत्ये सन्निहितामात्मनो मन्युदेवतामिवाभिषिंचंतं समुज्ज्वलकज्जलमहीधरवपुषं महामहिषमधिरूढं प्रौढसुहृदमिव प्र-

---

भयंकर दांतांनीं विजांच्या कडकडाटाप्रमाणें कडकड शब्द करीत असल्यामुळें भयंकर दिसणाऱ्या, व मस्तशरीर असल्यामुळें वरचेवर उत्त्वळणाऱ्या घामाच्या पाण्याच्या धारांनीं जणूं दुसरा पाऊसच पडतो कीं काय असें भासणाऱ्या, काळें कुट्ट शरीर असल्यामुळें पाण्यानें भरलेल्या आभाळाचें अनुकरण करितें कीं काय अशा शरीरानें प्रलयाच्या आरंभाप्रमाणें पुढें पुढें सरकत असलेला, विशाल व कठिण कपाळ असलेल्या, व मोठ मोठ्या व समुद्राप्रमाणें दिसणाऱ्या डोळ्यांतील एका छिद्रांतून निघालेल्या क्रोधरूप लक्ष्मीच्या विजय तोरणाप्रमाणें विलास करणाऱ्या ( नाचणाऱ्या ) भिवयांनीं युक्त असलेला, उद्दाम दांतांची पंक्ति असलेला, नाना तऱ्हेच्या माणसांचीं शिरें गोंवून अखंड व लांब अशी रुंडमाळा करून घातल्यामुळें भयंकर दिसत असलेलें ऊर असलेला, अट्टहासानें उघडलेल्या मुखविवररूप वारूळांतून निघालेल्या जिव्हारूप सर्पिणीचें आलिंगन केलेल्या, व निष्ठुर व भयंकर दाढावर गोंवलेल्या हजारो प्रेतांच्या शरीरांपासून गळणाऱ्या, व मोठमोठ्या भुजपर्वताच्या शिखरावरून झऱ्याप्रमाणें वाहणाऱ्या, आपल्या दाट तेजानें खड्या संध्याकाळच्या लालीची परंपरा लागली आहे कीं काय ? असें दिसणाऱ्या ताज्या रक्ताच्या धारेनें सर्व लोकांचा संहार करण्याच्या अधिकारावर संनिहित झालेल्या आपल्या मन्यु देवतेला ( क्रोध देवतेला ) अभिषेक करतो कीं, काय याप्रमाणें दिसत असलेला, अतिशय उजळ दिसणाऱ्या काजळाच्या पर्वताप्रमाणें शरीर असलेल्या, मोठ्या हाल्यावर ( रेड्यावर ) बसलेला, प्रलयसमयाच्या प्रौढ

लयसमयस्य प्राणसचिवं कालभैरवस्य प्रणयपात्रं कालरात्रेः केलिसहायं कालदहनस्य कुलभवनं क्रोधस्य मरुभुवनं करुणावाहिन्याः प्रचंडपवनं मंगलप्रदीपस्य प्रथमावलंबं हिंसासाधनस्य प्रथमाध्यापकं परिदेवनश्रुतिपाठस्य प्रलयजलधरमशुभारंभदंभोलिपातस्य प्रकृतिभिरिव घोरप्रकृतिभिर्भयंकरैः प्रलयहुतवहैः कालभैरवैरिव परिगतप्रचंडाजगरप्रतिभटभुजदंडपरिभ्रमितपरिघदंडचक्रशूलादिप्रहरणप्रसरं परिसरमापतंतं प्रलयजलधरमिव परिरटंतं कृतांतं समवलोक्य चकितचकितः समुदितभयांतरंगः शिवलिंगमालिलिंग तापसस्फुलिंगः तादृशं तमाचष्ट साट्टहासं सकलजनसंहरणविहितपट्टबंधः कृतांतः ॥ पद्यम् ॥ प्रतिदिनमुपनीतैः प्राणिजीवोपहारैर्भवति न परिपूर्तिर्यस्य कुक्षेरमेयैः॥स खलु विवृतरूपः सन्निधत्ते त्वदग्रे मुनिसुत शिवलिंगं मुंच पंचत्वभीरो ॥११९॥ मार्कंडेय जगज्जालमहाग्रासोदरंभ-

---

स्नेह्याप्रमाणें दिसणारा, काळभैरवाचा जिवाचा मंत्री, कालरात्रीच्या प्रेमाचें पात्र, कालाग्नीच्या क्रीडेला, सहाय असलेला, क्रोधाचें अनुवांशिक घर असलेला, करुणा रूप नदीचा निर्जल प्रदेश असलेला ( निष्करुण ), मंगलदीपाचा प्रचंड वारा, हिंसासाधनाला मुख्य आश्रय, शोकरूप वेदाध्ययनाला मुख्यत्वेंकरून अध्यापक असलेला ( पढविणारा—रडविणारा— ) अमंगलरूप विजांच्या कडकडाचा अभाळ असलेला, प्रकृतीप्रमाणें असलेल्या ( मंत्र्याप्रमाणें असलेल्या ) व भयंकर स्वभावाचे, भयंकर प्रलयकालच्या अग्नींनीं ( यांच्या सहायांनीं ) कालभैरवांनीं जसें यावें त्याप्रमाणें प्रचंड अजगरांप्रमाणें असलेल्या भुजदंडांनीं परिघ, दंड चक्र, शूल, वगैरे आयुधें गरगर फिरविणारा, अगदीं जवळ येणारा, प्रलयमेघाप्रमाणें ओरडणारा, अशा यमाला पाहून अतिशयच चकित झाला, व त्यामुळें त्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली, यामुळें अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या मुनिकुमारानें घाबरून शिवलिंगाला आलिंगन दिलें ( मिठी मारिली ). सर्व जनांचा संहार करण्याकरितां अभिषिक्त झालेल्या त्या यमानें मोठ्यानें हंसून त्या मुनीला ह्मटलें. मृत्यूला भिणाऱ्या मार्कंडेया, ज्याच्या पोटांत प्रतिदिवशीं अगणित प्राणी आणून घातले तरी पोट भरत नाहीं, तो काळ आ करून तुझ्यापुढें उभा आहे, याकरितां लौकर शिवलिंग सोड. (१२०) हे मार्कंडेया, कोट्यावधि जगांला ग्रासून पोट भरणाऱ्या त्या शिवलिंगाला मिठी मारून मला जिंकण्याची इच्छा धरतोस

रम् ॥ शिवलिंगं समालिंग्य जेतुमिच्छसि किं नु माम् ॥१२०॥ अद्य खलु हेलावलद्विपुलमत्करमूलशूलकीलाग्रघट्टनगवाक्षितवक्षसस्ते ॥ उद्बुद्बुदं ग्रसितुमुष्णमसृक्प्रवाहं श्रद्धालुतालुरदयालुरहं भवामि॥१२१॥ इति व्याहरन्नेव जरदजगरनीकाशेन कालपाशेन तमालिंगितशिवलिंगं बबंध जगदंतकः ॥ ततस्तत्करसंपीडिततनुरहितुंडकवलित इव मंडूको मृकंडुसुतः सानुक्रोशमीशं प्रत्याक्रोशमकरोत् ॥ पद्यम् ॥ प्रत्यक्षो भव शंभो प्रसीद मह्यं त्वदेकनाथाय ॥ व्याघ्र इव शीघ्रघाती मृगमिव मां हंतुमुद्यतः कालः ॥१२२॥ विश्वस्य नायकं त्वां विश्वस्याहं विडंबितकृतांतं ॥ पातुं जीवकलां मे कठिनमनाः कालएष उद्युंक्ते॥१२३॥करुणाकर करुणाकर करुणाकर कालपाशान्माम् ॥ परिपालय परिपालय परिपालय पार्वतीनाथ ॥१२४॥ इति विरचिताक्रोशमपि तं निरनुक्रोशः स्वकरपाशेन संचकर्ष रोषोत्कर्षेण तदनु निरवकाशं कीनाश-

---

काय?(१२१) आज तर माझ्या हातांत सहज लीलेनें गरगर फिरणाऱ्या या शूलाच्या टोंकानें भोंकें पाडलेल्या तुझ्या उरांतून निघालेलें उन्हून ताजें रक्त पिण्याकरितां चांगलें मन ठेवून मी आतां निर्दयता पत्करितों, सावध रहा. (१२२) असें बोलत बोलतच झाताऱ्या अजगरांप्रमाणें असलेल्या आपल्या पाशांनीं शिवलिंगाला मिठी मारिलेल्या मुनीला त्या अंतकानें बांधिलें. त्या यमाच्या तावडींत त्या मुलाचें शरीर सांपडल्याबरोबर सापाच्या तोंडांत बेडूक सांपडल्याप्रमाणें झालें. त्यामुळें तो मार्कंडेय आक्रोशानें श्रीशिवाला मोठमोठ्या स्वरांनीं ओरडूं लागला. भो ईशा, तुझ्याशिवाय दुसरा प्रभु मला कोणी नाहीं. हे शंभो, लौकर प्रसन्न हो. पहा पहा दीन होऊन रानांत जीव वांचविण्याकरितां धूम पळणाऱ्या हरिणाला दुष्ट वाघानें जशी गिळण्याकरितां झडप घालावी त्याप्रमाणें हा यम मला मारण्याकरितां माझ्यावरच चवताळून आला आहे पहा. (१२३) सर्व जगामध्यें लोक ह्मणतात कीं श्रीशिवापुढें काळाची गणना कांहीं नाहीं अशा हे जगत्प्रभो, तुला मी नमस्कार करतों. हें पहा माझी जीवकला पिण्याकरितां निर्दय मनाचा हा काळ चढून येतो. (१२४) भो करुणाकरा, करुणाकरा, करुणाकरा, पार्वतीनाथा, या दुष्ट कालपाशापासून माझें रक्षण कर, रक्षण कर, रक्षण कर. (१२५) याप्रमाणें कासाविशीनें आक्रोश केला तरी निर्दय यमानें अति संतापानें पाश घालून त्या मुलाला ओढिलें. तेव्हां एकदम यमाच्या हातांतल्या पाशाच्या आकर्ष-

करपाशसमाकर्षणसंभ्रमेण तदालिंगिते शिवलिंगे तन्मयतया सकलमप्यकंपत जगत्कदंबम् ॥ तत्रांतरे पलायमानभारतीसमाधानसावधाने तत इतः प्रचलितसरसीरुहासने किमिदमिति चिंताभ्रमितचेतसि वेधसि परिचकितजलधिदुहितृसरभसपरिरंभोदंचत्पुलकनिकुरुंबे प्रकंपितफणिपतिपर्यंकसंकुले भगवति जगदकांडचलनं कुतो भवतीति विचारपरायणे नारायणे प्रलयशंकासंकुचितमनस्सु सुमनस्सु शिथिलितकुलगिरिकीलकदंबे धरणिबिंबे विषमितनिजस्थितिषु दिग्गजततिषु प्रचलितप्रचुरवीचिनिचयलंघितवेलेषु जलधिजालेषु चलति रजतशिखरिणि च किमिदमिति जनितशंकः शंकरोऽपि सपदि मनसि विदितवृत्तांतः कृतांतस्य गर्वनिर्वापणाय भक्तजनप्राणपरित्राणाय तत्रैव विचित्रचरित्रः प्रादुरभूत् ॥ पद्यम् ॥ प्रादुर्भवन्नेव मृकंडुसूनोः प्राणाभिरक्षात्वरया पिनाकी ॥ बाणप्रयोगादिषु

---

णाच्या वेगानें सगळें जग एकदम हलूं लागलें कारण मुनिकुमारानें जगत्प्रभु शिवलिंगाला आवळून मिठी मारिली होती. इतक्यांत ब्रह्मलोकामध्यें सरस्वतीसावधानपर गोष्टी सांगत होती, तिची गोष्ट बंद पडली, ब्रह्मदेवाचें आसन डळमळूं लागलें, हें काय आहे ? असें घाबरून काळजीपूर्वक इकडे तिकडे ब्रह्मदेव डोळे फिरवूं लागला. असो तिकडे क्षीरसमुद्र खवळल्यामुळें लक्ष्मीनें घाबरून विष्णूला मिठी घातली. त्यामुळें श्रीविष्णूच्या सर्वांगावर रोमांच येऊं लागले. तसेंच आपण ( विष्णु ) बसलेल्या शेषाच्या आंगावरचे केंस ताठ उभे राहिले. तो शेष भयानें कांपूं लागला. नंतर नारायण मनांत ह्मणतो कीं यावेळेस जग विनाकारण कां हलूं लागलें कळत नाहीं इकडे सगळे देव ह्मणूं लागले कीं, आतां प्रळयकाळ जवळच आल्यासारखा दिसतो, कसें करावें ? आणि तिकडे कुलाचलांचे सगळे सांधे तुटल्यामुळें पृथ्वी डळमळूं लागली. आणि दिग्गज सर्व घाबरून सैरावैरा पळूं लागले, लाटा फार उसळल्यामुळें समुद्र सर्व कांठ ओलांडून चढूं लागले. फार काय प्रत्यक्ष कैलास देखील डळमळूं लागला तेव्हां मात्र श्रीशंकरांनीं हें काय असेल ? असा विचार करून मनाचा निर्धार केला कीं हा सगळा प्रभाव त्या कृतांताचा आहे. असें उमजून त्याचा गर्व दूर करण्याकरितां व भक्ताचें रक्षण करण्याकरितां त्याच ठिकाणीं ( शिवलिंगाच्या ठिकाणीं ) विचित्र चरित्राचे श्रीशिव प्रकट झाले. मार्कंडेयाचे प्राण वांचविण्याकरितां शिवलिंगामध्यें प्रकट झाल्याबरोबरच पिनाकधारी शिवांनीं बाणसंधान करावा तो सोडावा इतका

नावकाशो जघान पादांबुरुहेण मृत्युम्॥१२५॥ पश्चाददलोकयदमुं स मृकंडुसूनुः प्रत्यक्षतामुपगतं पतिमंबिकायाः ॥ पूर्वं तदीयपदताडनयापतंतं वैवस्वतं कुलिशभिन्नमिवाद्रिराजम्॥१२६॥पादाहते निपतिते काले भुवि पिनाकिनः ॥ नम्रीवभूव युगपन्नागेंद्रस्य फणावलिः ॥१२७॥ कुलमहिध्रसन्निभस्य मृत्योर्निपतनसंभ्रमतो निनाद ऊर्व्यां ॥ प्रलयपवनपाटितस्य मेरोः शिखरकदंबनिपातनादिवासीत् ॥१२८॥ अस्मानपूजयदसौ न मृकंडुसूनुः पादार्चकः किममुनेति पिनाकपाणेः ॥ बव्हायुधैरपि विलंवितमेव हस्तैः पादस्तदर्चिततया प्रजहार मृत्युम् ॥१२९॥ गद्यम् ॥ अत्रांतरे पशुपतिपरसेवकानां देवासुराणां मणिमकुटततिभिरभवदपरिमितचंडकरमंडितमिव गगनमंडलं श्रुतिमधुरगभीरं रराण विबुधनिःस्वानः परिमलसमाहूतसकलमधुकरसृष्टिः पपात सुरतरुपुष्पवृष्टिः ॥पद्यम् ॥ मृत्योः स मृत्युं प्रणिपत्य देवं मृकंडुजः कंटकितांग-

---

अवकाश नाहीं असें समजून तावडतोब त्या यमाला जोरानें आपल्या पायानें एक लाथ मारिली. (१२६) नंतर प्रत्यक्ष झालेल्या अंबिकापतीला त्या मार्कंडेयानें प्रथम पाहिलें, नंतर वज्रानें चेंदामेंदा होऊन पडलेल्या मोठ्या डोंगराप्रमाणें त्या ईश्वराच्या लाथेसरशीं घायाळ होऊन पडलेल्या यमाला पाहिलें. (१२७) श्रीशिवाच्या लाथेनें जमिनीवर तो यम पडल्यावरोबर श्रीमहाशेषाच्या फडा जशा वांकाव्या त्याप्रमाणें एकदम तो यम नरम आला. (१२८) कुलाचलाप्रमाणें शरीर असलेला तो यम जमिनीवर आदळल्यावरोबर प्रळयकाळच्या वाऱ्यांनीं हालत असलेल्या मेरूच्या शिखरावरून सुळे खालीं पडल्यावरोबर जसा आवाज निघावा तसा मोठा आवाज झाला. (१२९) यमाला शिवांनीं लाथ मारण्याचें कारण असें कीं, वास्तविक या मार्कंडेयानें माझी कांहीं आराधना केली नाहीं, परंतु माझ्या पायाची सेवा केली. असा विचार मनांत आणून आपल्या हातांत अनेक आयुधें असलीं तरी त्या आयुधांनीं यमाला न मारितां पायानेंच मारिलें (१३०) इतक्यांत पशुपतीचे चरणसेवक देवदैत्य यांच्या डोक्यांवरील किरीटांतील रत्नें अगणित आकाशांत जमलीं त्यामुळें कोट्यावधि सूर्यच एकदम उदित झाले कीं काय असें दिसलें. याप्रमाणें देवदैत्यसमूह जमल्यावरोबर कानाला गोड असा त्यांचा आवाज आकाशामध्यें घुमूं लागला. फुलांतील परिमलानें (सौगंध्यानें) बोलावून आणिलें कीं काय याप्रमाणें सभोंवतीं भुंगे जमूं लागले अशीं कल्पवृक्षाचीं फुलें देवांनीं श्रीशिवावर उधळलीं. मृत्यूचा मृत्यु अशा अंबिकापतीला न-

थष्टिः ॥ प्रमोद बाष्पाकुलदृष्टिरस्य पादारविंदस्तुतिमाबबंध ॥१३०॥ अंभोजवासादिभिरप्युपाशः शंभो त्वदीयश्चरणप्रवालः॥ अंभोजसारोऽपि कृतांतशैले दंभोलिकेलिं विदधे क्षणेन ॥१३१॥ अन्विष्टमाम्नायगिरां शिरोभिरदृष्टमद्यापि परेण पुंसा॥दृष्टं मयाऽदृष्टवशादिदानीं शंभो त्वदीयं चरणारविंदम् ॥१३२॥ समर्पितं यत्र सकृन्नराणां पुष्पं प्रसूते पुरुहूतलक्ष्मीम् ॥ छंदःशिखाभूषणमिंदुमौले कदाऽऽश्रये ते चरणारविंदम् ॥१३३॥ उत्तालसौरंभकरालकाल भेतालवित्रासनभेषजेन ॥ त्वत्पादपद्मस्मरणेन शंभो तरंति धन्याः किल कालकक्ष्याम् ॥१३४॥ वंशो यशस्वी पितरौ कृतार्थौ पुण्योत्तरा तेन च भूतधात्री॥ शंभोऽसकृत्ते चरणारविंदचिंतामृते मज्जति यस्य चेतः ॥१३५॥ यद्दर्शनासंभवलज्जयैव मध्येसमुद्रं मधुकैटभारिः ॥ निद्रातिगूढाकृतिरेव नित्यं तत्ते भजे शंकर पादपद्मम् ॥१३६॥ गद्यम् ॥ इति स्तुवंतं मुनिसुतं सदयमवलो-

---

मस्कार केल्यावरोबर त्याच्या अंगावर रोमांच प्रादुर्भूत झाले. आणि डोळ्यावाटें आनंदाश्रु गळूं लागले. नंतर अशा त्या मार्केडेयानें श्रीशिवाची स्तुति केली.(१३१) हे शंभो, तुझ्या चरणाची सेवा कमलासनादि ( ब्रह्मदेव वगैरे ) देवही करतात, ते तुझे पाय कमलांतल्या गाभ्यापेक्षांही कोमल आहेत परंतु पर्वताकार शरीराच्या यमाच्या ठिकाणीं एका क्षणांत विजेप्रमाणें खेळूं लागले. (१३२) भो शंभो, तो नारायण उपनिषदांच्या साधनांनीं अझून ते तुझे पाय शोधीत आहे, परंतु त्याला जे पाय दृष्टीस पडले नाहींत, ते पाय अदृष्टानें ( नशिबानें ) प्रस्तुत येथें माझ्या दृष्टीस पडले.(१३३) भो देवाधिदेवा, एकवार तुझ्या पायावर फूल वाहिलें म्हणजे त्याच्या योगानें मानवांना इंद्राची संपत्ति मिळते. वेदशिखेला ( उपनिषदांना) भूषणभूत अशा त्या चरणकमलाचा आश्रय मी केव्हां करीन बरें ? (१३४) भरभराटीनें वाढलेल्या ताडाप्रमाणें भयंकर दिसणाऱ्या कालभेतालरूप रोगाला त्रास देऊन बाहेर घालविणारें औषध ज्याला म्हणतात, अशा चरणकमलाच्या स्मरणानें जे काळाच्या तडाक्यांतून तरून जातात ते धन्य होत. (१३५) भो प्रभो, एकवार कां होईना तुझ्या चरणारविंदाच्या चिंतनांत ज्याचें मन तल्लीन होतें, त्याचा तो वंश यशस्वी होय, त्याचे मातापितर धन्य होत, फार काय ? त्याच्यामुळें रत्नगर्भा ही पृथ्वी धन्य होय. (१३६) ज्या चरणाचें दर्शन घडत नाहीं म्हणूनच कीं काय या लाजेनें समुद्राच्या मधोमध गुप्तपणें तो महाविष्णु निजून राहिला आहे. भोशंकरा, त्या तुझ्या चरणाचें भजन मी करतों. (१३७) याप्रमाणें स्तोत्र

क्य त्रैलोक्यपतिरुमापतिरन्वग्रहीत् ॥ पद्यम् ॥ दत्तं ते दीर्घमायुष्यं मार्कंडेय मया यथा ॥ कल्पते दिनकल्पस्ते कल्पः कमलजन्मनः॥१३७॥ किंच ॥ पद्मासने किंनु पदे रुचिस्ते भद्रासने नामुचिशासने वा ॥ वित्तेशलक्ष्म्यामथ वा विमुक्तौ वृणु त्वमिष्टानि मृकंडुसूनो ॥१३८॥ गद्यम् ॥ इति सप्रसादमभिहितवति भगवति सपुनर्विज्ञापयामास प्रज्ञापयोनिधिस्तपोनिधिः भगवन् प्रसीद ॥ पद्यम् ॥ सुधांशुमौले तव पादचिंतनं सुरेंद्रसिंहासनपट्टबंधनम् ॥ त्वदीयमाराधनमेव मे धनं त्वदन्यमुक्तिर्मम मुक्तिरुत्तमा॥१३९॥ तथापीदं प्रार्थ्यते ॥ पद्यम् ॥ भवतु तव पदाब्जे भक्तिरर्धेंदुमौले कमलभवदुरापा कांक्षणाकामधेनुः ॥ दिनपरिणतयो मे जन्मसाफल्यसिद्धिं विदधतु भुवि पित्रोः पादशुश्रूषयैव ॥१४०॥ गद्यम् ॥ इति विज्ञापनानंतरं यथारुचि निरस्तसमस्तापायमास्तां भवानिति तमनुगृह्य तदनु समंततः स्तुतिमुखरमुखैः शतमखमुखैर्बर्हिर्मुखैर्बहुमुखमभ्यर्थितोऽभूत् ॥ जय जय महादेव भगवन् प्रसीद

---

करणाऱ्या त्यां मुनिकुमाराकडे सदयपणें अवलोकन करून त्रैलोक्यपति उमापतीनें अनुग्रह केला. बाबा मार्कंडेया, तुला अतिशय दीर्घ आयुष्य दिलें आहे फार काय, ब्रह्मकल्प तुला एक दिवसाप्रमाणें वाटेल. (१३८) आणि तुला ब्रह्मपद पाहिजे काय? अथवा नमुचिदैत्याचा संहार केलेल्या त्या इंद्राचें सिंहासन पाहिजे काय? अथवा कुबेराची संपत्ति तुला पाहिजे काय? भो मार्कंडेया, प्रत्यक्ष मोक्षलक्ष्मी पाहिजे काय? किंवा तुझ्या मनांत जें मागावयाचें असेल तें मागून घे. (१३९) याप्रमाणें श्रीभगवान सुप्रसन्न मुद्रेनें बोलत असतां मोठा बुद्धिमान असा तो तापसकुमार पुनः विज्ञापना करूं लागला. भगवन् शंभो, प्रसन्न व्हा, भो चंद्रशेखरा, तुझें पादचिंतन करणें हेंच मी इंद्रपदाचा राज्याभिषेक समजतों, तुझी आराधनाच माझें धन समजतों. तुझ्याशिवाय दुसरी श्रेष्ठ मुक्ति मला कोणती आहे. (१४०) तथापि मी मागतों. चंद्रशेखरा, ब्रह्मदेवालाही मिळण्यास अशक्य असलेली, इच्छेला पूर्ण करणाऱ्या कामधेनूसारखी असलेली, तुझ्या चरणाची भक्ति मला दे. प्रत्येक दिवसाचा परिणाम ( शेवट ) आणि माझा जन्म लोकांत असलेल्या मातापितरांच्या सेवेनें सफल होवो. (१४१) याप्रमाणें विज्ञापना केल्यानंतर तुझे सर्व अपाय दूर पळून जावोत. असा अनुग्रह आनंदानें मार्कंडेयावर श्रीशिवांनीं केला. नंतर चोहोंबाजूंनीं जमलेल्या इंद्रादिदेवांनीं श्रीशिवाची प्रार्थना केली. भो महादेवा तुमचा जयजयकार होवो, आह्मांस प्रसन्न व्हा, प्रसन्न

प्रसीद सह्यतामयमपराधः जगदनुग्रहाय जीवितेश्वरं जीवंतं विधेहीति॥पद्यम् ॥ तथा स शंभुः सुरनाथनाथितो मृतं कृतांतं क्षितितलशायिनम्॥पदेन पस्पर्श तदंतकारिणा समुत्थितोऽभूत्तदनुग्रहेण सः॥१४१॥ प्राप्तजीवमथ जीवितेश्वरं पादपंकजरजःप्रसादतः ॥ वीक्ष्य तं प्रणतलोकरक्षणादीक्षितो वचनमेनमब्रवीत् ॥१४२॥ भक्ता ये प्राणभूताः परिहर भुवि तान् दूरतो दंडपाणे भक्ताः स्वाचारनिष्ठाः प्रगुणितविभवा भस्मरुद्राक्षचिन्हाः ॥ अन्येष्वेवाधिकारः प्रभवतु भवतो दीयमानो मयासौ प्राप्य स्वस्थानसीमां परिचिनु पुनरप्यप्रमाद्य स्वकार्यम्॥१४३॥ गद्यम् ॥ इति पशुपतिः पितृपतये प्राणघटनपूर्वं सर्वमपि कर्तव्यतांशमुपदिश्य ग्रस्यमान इव सपरिवारस्तत्रैव तिरोहितोऽभूत् ॥ततः पितृपतिरपि पशुपतिभक्तानामनुभावमंतरनुसंदधानः ॥ सपदि स्वपदमयासीत् ॥ ततः स तपस्विकुमारोऽपि शंकरप्रसादातिशयभाजनमा-

---

व्हा. आमचा अपराध सहन करा, सहन करा. सर्व जगाच्या अनुग्रहाकरितां या कृतांताला पुनः जीवदान द्या. याप्रमाणें सगळ्या देवांनीं प्रार्थना केल्यावरोबर जमिनीवर निजलेल्या मृत कृतांताला श्रीशिवांनीं आपल्यात्याच पायानें पुनः स्पर्श केला. त्यामुळें त्याच पायाच्या अनुग्रहानें तो यम पुनः जीवंत होऊन उठला. (१४२) पादपंकजाच्या प्रभावानें जीवंत झालेल्या यमाकडे नम्र झालेल्या लोकांच्या रक्षणाच्या हेतूनें श्रीशिवांनीं पाहिलें आणि यमाला ह्मटलें कीं, (१४३) भो दंडपाणे यमा, भूलोकांत माझ्या प्राणापलीकडे असलेल्या भक्तांना सोडून दूर राहत जा. कारण माझे भक्त स्वधर्मामध्यें निष्ठावान असून दुप्पट वैभवाचे असतात. सर्वांगाला भस्म लावून गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा घालीत असतात. याकरितां तुझा अधिकार दुसऱ्यावरच चालीव. आतां तुला मीं हद्द करून दाखविली आहे तिच्यापलीकडे पुनः प्रमादानें जाऊं नकोस. (१४४) याप्रमाणें यमाला प्राणदानपूर्वक इतिकर्तव्यतेचा उपदेश करून एखाद्यानें एखादा पदार्थ गिळल्याबरोबर तो पदार्थ जसा नाहींसा होतो, त्याप्रमाणें श्रीशिव आपल्या परिवारासह तेथल्यातेथेंच नाहींसे झाले. नंतर यम देखील श्रीशिवभक्तांचा प्रभाव मनांत समजून तात्काळ निजस्थानाला गेला. नंतर इकडे तो मुनिकुमार देखील आपल्या तपश्चर्येनें श्रीशिव प्रसन्न झाले यामुळें त्यांच्या प्रेमाला आपण पात्र होऊन पुनीत झालों, असें मनांत समजून त्यानें घरीं येऊन सर्व वृत्तांत आपल्या

त्मानं पावनं मन्यमानो निजवरप्रसादश्रवणजनितपरमानंदपरिवाहितहृदयाभ्यां पितृभ्यामन्वागतो निमिषमिव तत्परिचरणमहोत्सवेन कल्पमपि विभावयन् अनल्पसुखमन्वभूत् ॥१४४॥

इति श्रीकविवादिशेखरकृतौ शिवचरित्रे प्रथमोच्छ्वासः ॥

---

आईबापास सांगितला. श्रीशिवानें दिलेले वर ऐकून मोठ्या आनंदानें आपल्या मुलाला भेटून मुलाला घेऊन आश्रमांत पत्नीसहित मृकंडु ऋषि आला. नंतर माता पितरांच्या शुश्रूषेनें एककल्प एका क्षणासमान घालवीत मोठ्या सुखांत तो मार्कंडेय राहिला.

याप्रमाणें कविवादिशेखरकृत शिवचरित्रांतला पहिला उच्छ्वास संपला.



## ॥ अथ द्वितीयोच्छ्वासः ॥

श्रीगुरुशंभुलिंगाय नमः ॥ गद्यम् ॥ अथेदानीं कालकालस्य कालकूटकबलनकथा प्रस्तूयते ॥ पद्यम् ॥ पुरा पुराणपुरुषं पुरोधाय सुरासुराः ॥ ममंथुर्वाहिनीबंधुं दुग्धसिंधुं सुधाशया ॥१॥ गद्यम् ॥ तदा खलु मधुमथनपृथुलभुजयुगस्तंभसंभृतावष्टंभेन कुंभीनसपरिवृढदृढतरगुणसंभावितेन कुंभिनीभरणकर्मठकमठकठिनपृष्ठप्रतिष्ठितेन वलिष्ठविबुधदनुजवरिष्ठपरिषदधिष्ठितेन मंथानतामुपनीतेन मंदरगिरिकंदरेण विहितमथनारंभे जलधिकुंभे विजजृंभे ॥ सपदि लंघितनिखिलकुलगिरिशिखरकूटः कल्लोलकूटः ॥ पद्यम् ॥ पयः पयोधेः परिमथ्यमानात्समुद्गता तुंगतरंगमाला ॥ ब्रह्मांडभित्त्यंतरमंतरेण मध्ये न लेभे गतिमार्गरोधम् ॥२॥ मथनरयसमुत्था मंदराद्रेः समुद्रादवहतगतिवेगा राजयः सीकराणाम् ॥ स्तनभुवि निपतंत्यः सत्यलोकांगनानामजुकलमपसूत्रा हारमाला बभूवुः ॥३॥ गद्यम् ॥ विपुलतरमंथानमंदरगिरिभ्र-

---

श्रीगुरुशंभुलिंगास नमस्कार असो. (१) आतां यावेळेस कालाचा काल अशा श्रीशिवांनीं कालकूट विष प्राशन केलेलें चरित्र सांगतात. पूर्वी एकदां पुराणपुरुष श्रीनारायणाला पुढें करून नदीपति क्षीरसमुद्राचें मंथन अमृताचे कांक्षेकरितां सगळ्या दैत्यांनीं व देवांनीं केलें. (२) तेव्हां महाविष्णूनें आपल्या विस्तृत पुष्ट बाहूनें ज्याला धरिलें आहे, व महाशेषरूप रज्जूनें (दोरीनें) ज्याला चांगल्या तऱ्हेनें आवळिलें आहे, व कुंभिनी नांवाच्या स्त्रियेचें उदर पोषण करण्यांत प्रवीण अशा महाकूर्माच्या कठिण पाठीवर ज्याची प्रतिष्ठा केली आहे, व बलिष्ठ देव दानवांनीं ज्याला धरिलें आहे, ज्याची योजना रवीच्या ठिकाणीं झाली आहे, अशा मंदरपर्वताच्या सहाय्यानें क्षीरसमुद्र घुसळीत असतां समुद्र खवळून वर आला. तात्काळ लाटा जोरानें उसळल्यामुळें कुलगिरीचे शिखरावर असलेले सुळे सगळे पाण्यानें भिजून गेले. क्षीरसमुद्र घुसळीत असतां ज्या उंच उंच लाटा उसळूं लागल्या, त्या लाटांचा आवेग आवरावयास ब्रह्मांडांच्या शेवटच्या भिंती खेरीज मध्यें कोणाचें सामर्थ्य झालें नाहीं. (३) मंदरपर्वतरूपरवीनें अतिशय जोरानें घुसळल्यामुळें त्या वेगानें निघणारे, व अप्रतिबंध वेगाचे तुषार सत्यलोकांतील स्त्रियांच्या स्तनांवर पडूं लागले त्यामुळें त्यांच्या गळ्यांतील हार तुटून पडावयास लागले. (४) रवीच्या ठिकाणीं योजना केलेला मंदरपर्वत अतिशयच मोठा असल्यामुळें

मणरभससंभ्रमेण क्षितिरपि निखिलकुलगिरिकदंबकेन सह चकंपे युगपदुद्धृत्तपुष्कलावर्तकपुरःसरघनाघनघटाघट्टनपटुरटितगर्वसर्वंकषः पुरुषपौरुषकूलंकषदनुजरणारंभसंपदकुंठभुजवैकुंठवदनमरुदाध्मातसमुदंचितपांचजन्यनिनदप्रपंचपरिभावुकः प्रबलतरपुरपरिमर्दननिर्दयकठोरकरास्फालनरयमुखरहाटकमहीधरकोदंडकुंडलीशगुणघोष - भीषणसंरंभः समुज्जृंभितजलधिमथनसंभूतः कोऽपि मरुद्ध्वनि महाध्वनिः ॥ यत्प्रतिध्वनिनिभेन मथनरयपरिभ्रमदवनीभरभरणदुस्थां निजनिजावस्थामभिदधान इवालक्ष्यत सर्वतः कुलपर्वतगणः किं बहुना सरभसमथनसंभ्रमादुदधिविवरमुल्लोलकल्लोलसमुच्चलशिलोच्चयसमुन्मथितमकरनिकरमुद्भ्रांतनक्रचक्रमुद्दलितविद्रुमद्रुममुच्छिन्नपन्नगकुलमुन्मुखवडवामुख मुद्दंडफेनपिंडमुल्बणपयःकणमुपपन्नजलमनुजमिथुननिधनमुत्त्रुटितराजीववनमुत्सारितकंबुबिंबमभवत् ॥ पद्यम् ॥

---

घुसळतांना तो पर्वत जसजसा फिरूं लागला तसतशी पृथ्वीही कुलगिरीसह हृदरूं लागली व प्रलयकाळचे पुष्कलावर्तकादि मेघ एकदम येऊन मंडलाकृतीनें जमून त्या सर्वांनीं जो गडगडाट करावा, त्या गडगडण्याचा गर्व परिहार करणारा व महापराक्रमी दैत्यांना मारण्याकरितां आरंभिलेल्या संग्रामांत महाविष्णूनें ज्या पांचजन्याचा नाद करावा, त्याप्रमाणें भासणारा, आणि प्रबळ झालेल्या त्रिपुरासुराला मारण्याकरितां महामेरु धनुष्य करून महाशेष प्रत्यंचा (दोरी) करून संग्रामाच्या वेळेस श्रीशिवांनीं जो टणत्कार केला त्याच प्रमाणें भासत असलेला, खवळलेल्या समुद्रांतून निघणारा भयंकर आवाज आकाशांत घुमूं लागला. मथनाच्या वेगानें गरगर फिरणाऱ्या पृथ्वीचें पोषण करावयास असमर्थ झालेली आपली अवस्था दाखविण्याकरितांच कीं काय सगळे कुलपर्वत मोठ मोठ्यानें प्रतिध्वनि करूं लागले. फार काय, वेगानें मंथन केल्यामुळें समुद्रांतील लाटांनीं मोठमोठ्या शिळा वर येऊन पडूं लागल्या, तिमितिमिंगिल वगैरे मोठ मोठे मासे, सुसरी, कांसव वगैरे जलचर प्राणी चळवळ करूं लागले. सर्प वगैरे आपल्या फणावरचे मणि टाकून देऊन तोंडांतून फेंस काढूं लागले, समुद्राच्या मधोमध वडवाग्नि भडकून सभोंवतीं ज्वाला पसरूं लागला, समुद्रांतून वरचेवर फेंस येऊं लागला, आधण आल्यामुळें पाणी सळसळूं लागलें. पाण्यांतील माणसें आपापल्या बायकांसह मरण पावूं लागलीं. पाण्यांतलीं कमळें सगळीं उध्वस्त झाल्यामुळें कमलाचें वन नाहींसें

निर्मथ्यमाने पयसां निधाने मंथानशैलभ्रमतो विशीर्णाः ॥सविद्रुमाः शंखचया विरेजुः कंकाळभंगाः क्षतजैरिवार्द्राः ॥४॥ प्रक्षोभितानां फणिपुंगवानां फूत्कारझंझापवनस्य भूम्ना ॥ मंथानघातव्यथयेव सिंधोर्निश्वासवातं नितरां मुमोच ॥५॥ मंदरेण ममंथुस्ते सिंधुमुद्भूतजीवनम् ॥ साक्रोशमपि दंडेन स्वदेशमिव दुर्नृपाः ॥६॥ अमंथि सुरपुंगवैः पुनरबंधि शाखामृगैरखानि सगरात्मजैः पुनरपायि कुंभीभुवा ॥ सदापि खलु दह्यते जलधिरंतरौर्वाग्निना विपत्तिजटिलस्थितिर्बहुलजीवनानामहो ॥७॥ गद्यम् ॥ तत्रांतरे सपदि मंदरगिरिशिलातटताडनजनितरोषस्य सर्वजगदर्वाचीनस्य ऋषेः कालाग्निरुद्रस्य निर्निद्रनिटिलनिष्ठ्यूतः ॥ कालदहन इव कठोरपरिणतिः सुपर्ण इव संहारसमयस्य महार्णवान्मथ्यमानादुदचलदुच्चशिखाकबलितभुवनभ-

---

झालें. पाण्यांतील शंख आपोआप दूर दूर वर जाऊन पडूं लागले. क्षीरसमुद्र घुसळीत असतां मंदरपर्वत जो गरगर फिरूं लागला त्याच्या योगानें पोंवळ्यासह शंख सर्व फुटून फुटून वर येऊन पडूं लागले, ते तुकडे रक्तानें भिजलेल्या पाठीच्या कण्याच्या तुकड्याप्रमाणें दिसूं लागले. (५) क्षुब्ध झालेल्या सर्पांच्या फूत्काररूप झंझावाताच्या योगानें (सोसाट्याच्या वाऱ्यानें) समुद्र हा घुसळणें सहन न झाल्यामुळें मोठ मोठे श्वास टाकितो कीं काय असें वाटलें. (६) प्राणी सर्व कासावीस करतात तथापि मंदरपर्वताच्या साह्यानें ते सर्व देवदैत्य समुद्र घुसळूं लागले. तेव्हां प्रजा वाटेल त्या तऱ्हेनें आक्रोश करीत असली तरी दुष्ट राजानें जशी कडक शिक्षा करावी, त्याप्रमाणें दिसलें. (७) देवांनीं घुसळलें, वानरांनीं उरावर पूल बांधिला, सगर राजाच्या मुलांनीं खणून काढिलें, अगस्त्यानें पिऊन टाकिलें, याशिवाय वडवाग्नि नेहमीं पोटांत राहून जाळितो, याच्यावरून विचार करून पाहिला असतां पुष्कळांचें पोषण करणाऱ्या कुटुंबी प्राण्यांची दशा नेहमीं संकटांत असते (किंवा पुष्कळ पाणी ज्यांत आहे असा समुद्र संकटांत आहे असें तात्पर्य). (८) असो इतक्यांत मंदरपर्वताच्या शिळा घांसून घांसून संताप आलेल्या, व सर्व जगाच्या पुरातन कालापासून असलेल्या कालाग्निरुद्र ऋषीच्या तेजस्वी कपाळांतून उत्पन्न झालेल्या कालाग्नी प्रमाणें व कठोर परिणाम करणारा, संहार कालांतील (प्रळय कालांतील) गरुडाप्रमाणें असलेला, कालकूट (या नांवाचें विष) समुद्र मथनापासून उत्पन्न होऊन आपल्या उंच उंच ज्वाळांनीं

वनकूटः कालकूटः तस्य विषविशेषस्य महोष्माभिहतः पयोनिधिरपि प्रचुरबुद्बुदकदंबापदेशेन प्रकटितबहुस्फोटकमुकुल इवासीत् ॥ ततः समुदंचितसकलसुरासुरभयकोलाहले हालाहले प्रसरितहुतवहपरिगतमेकमिव त्रिभुवनमभूत् ॥ पद्यम् ॥ विहाय मथनं देवा विहायसि समुद्ययुः ॥ विषाक्रांतादपक्रांता विहंगकुलसंकुलाः ॥८॥ विश्रांतिमापद्यत सद्य एव महापयोधेर्मथनाद्विरावः ॥ हालाहलत्रासजुषां सुराणां कोलाहलस्तद्द्विगुणो बभूव ॥ मंदः शक्त्या मुकुंदः शतधृतिरधृतिर्वायुरायुर्निराशो निर्व्यापारः कुबेरः सपदि समभवत्कालकूटे निरूढे ॥ यक्षाः स्थातुं न दक्षाः क्वचिदपि विवशाः किंनराः खिन्नरागा गंधर्वा मंदगर्वाः सपदि निरपतन्मोहिताशाः पलाशाः ॥ आकाशे नो चकाशे ततिरपगतरुक्संग्रहाणां ग्रहाणां मेघा मोघांबुगर्भास्त्रिभुवनसरणिं कालकूटेऽवगाढे ॥९॥ रुद्रा निद्राणहृदया वसवः शंकितासवः ॥ आदि-

---

सर्व लोकांला जाळून टाकितो कीं काय याप्रमाणें भासूं लागला. पाण्यावर फेंस अतिशय आल्यामुळें कालकूट विषाची प्रखर झळ लागून समुद्राच्या अंगावर पुळ्या आल्या कीं काय असा भास होत असे. त्या कालकूटाच्या भीतीनें देव दैत्यांमध्यें एकच कल्होळ उसळला. तेव्हां चोहोंकडे पसरलेल्या आगींत त्रिभुवन सर्व एकवटलें कीं काय असें वाटत होतें. नंतर सर्व देव समुद्र घुसळावयाचें सोडून देऊन आकाशांत पळून गेले. तसेंच विषाच्या प्रखर तेजानें विव्हळ होऊन सर्व पक्षी देखील आकाशांत पुष्कळ दूरवर उडून गेले. (९) समुद्रमथनापासून निघालेले महाशब्द तात्काळ बंद पडले परंतु हालाहलाच्या त्रासानें संतप्त झालेल्या देवांचा कलकलाट मात्र त्याच्या दुप्पट वाढला. कालकूट उत्पन्न झाल्याबरोबर मुकुंदाची शक्ति मंदावली, शतधृतीची (इंद्राची) धृति (धैर्य) गळाली वायूला आपल्या आयुष्याचा भरंसा वाटला नाहीं. कुबेराचा व्यापार बंद पडला. तेथें राहण्याविषयीं यक्षांचा दक्षपणा लोपून गेला. कोठेंही परवश न झालेले किंनरांचा अनुराग नष्ट झाला, गंधर्वांचा गर्व पार निघून गेला, पलाशांची (राक्षसांची) आशा नष्ट झाली. निरोगी ग्रहांची पंक्ति आकाशांतून नाहींशी झाली. मेघांच्या पोटांतलें पाणी आटून गेलें, याप्रमाणें कालकूटविष त्रिभुवनांत एका क्षणांत व्याप्त झालें. (१०) विषाच्या आगीनें रुद्र सर्व निद्रिस्त झाले (झोंपा घेऊं लागले). अष्टवसु आपल्या प्राणांविषयीं निराश झाले. सूर्य सर्व निस्तेज होऊन

त्या निजदीधित्या मुक्ताः सक्ता विषाग्निना ॥१०॥ सद्यो नद्यो ययुः शोषं नेशुराशु मृगाः खगाः॥ सर्वतः पर्वतस्तोमा विरला गरलाग्निना॥११॥ मांगल्यभंगपरिशंकिमनोगतीनां वक्षोरुहद्वयनिविष्टकरद्वयानाम् ॥ स्वेच्छापलायनविनष्टनिजप्रियाणां हाहारवो भृशमभूदमरांगनानाम् ॥१२ गद्यम् ॥ एवमत्युत्कटकालकूटसंकटे मज्जति जगति निखिलभुवननिर्माणकर्मिणो ब्रह्मा मनस्यैवमचिंतयत् ॥ अहो सकलजनशेमुषीमुषविषविशेषस्य महिमा यदिदानीम् ॥ पद्यम् ॥ वयं भयतरंगिता द्रुतगतिं न मुंचामहे पलायनपरायणो भवति हंत नारायणः ॥ कृतांतकवलांतकप्रभृतयोऽपि धावंत्यमी कुतोऽन्यगणनाविधिः शिव शिव त्रिलोकी हता ॥१३॥ हंत फलवैपरीत्यम् ॥ सुरैः सुधायै मथितात्पयोधेः समुत्कटोऽजायत कालकूटः ॥ पटीरपंकैरनुलेपमिच्छोः प्राप्तोऽयमंगारमयोऽगरागः ॥१४॥ गद्यम् ॥ किमत्र प्रतिविधेयं किंवा लोकस्य पराय-

---

काळे पडले. (११) कालकूटाच्या आगीनें सर्व नद्या कोरड्या पडल्या, मृग आणि पक्षी पटापट मरून पडूं लागले, सर्व पर्वत गळून पडूं लागले. (१२) कालकूटाच्या त्रासानें सर्व देव आपल्या इच्छेस वाटेल तिकडे पळून गेल्यामुळें त्यांच्या स्त्रियांच्या मनांत आपल्या सौभाग्याविषयीं भलभलते संशय येऊं लागले ह्मणून आपल्या छातीवर दोन्ही हातानें बडवून घेऊन मोठमोठ्यानें त्या सर्व देवांगना रडूं लागल्या त्यामुळें स्वर्गामध्यें मोठाच हाहाःकार उडाला. (१३) याप्रमाणें अतिशय संकटामध्यें सर्व जग बुडालें असतां सर्व जगाचा कर्ता ब्रह्मदेव आपल्या मनामध्यें विचार करूं लागला. सर्व जग ज्याच्यापुढें थकून गेलें आहे, काय, या विषाचें प्राबल्य आहे पहा. कारण प्रस्तुत आह्मी देखील त्या विषाच्या भीतीनें चकित होऊन सैरावैरा पळत सुटलें आहोंत. आणि हा नारायण देखील धूम पळत सुटला आहे, सगळ्या जगाला गिळणारे यम वगैरे देवही पळत सुटले आहेत, तेथें यःकश्चित प्राण्यांची गणना कोठें होणार ? हरहर आज त्रैलोक्य सर्व उध्वस्त झालें. (१४) काय हें उलटें फळ आलें पहा याला धिक्कार असो. देवांनीं अमृताकरितां समुद्र घुसळला काय ? आणि त्याच्यापासून भयंकर हा कालकूट काय उत्पन्न झाला ? अंग गार करून घेण्याकरितां एखाद्यानें चंदन लावून घेण्याची इच्छा केली तर त्याच्या अंगावर निखाऱ्याचा पाऊस पडल्याप्रमाणें हें झालें. (१५) आतां याला प्रति तोड कोणती काढावी बरें ? कशापासून जगाचें

णम् ॥ अकांड एवास्य संपन्नः प्रलयः भवतु नाम निखिलजगद्वनपारीणो भगवान्नारायणः ॥ स्वशक्तिमजानन् प्राकृत इव पलायते ॥ पद्यम् ॥ तदैवैनं तत इतः समाहूतसुरासुरः॥ सोऽहमुद्बोधयिष्यामि सत्वोदाहरणादिभिः ॥१५॥ इति संचिंत्य चतुर्मुखः स्वाभयोक्तिसंमुखैः सर्वैरपि शतमखप्रमुखबर्हिर्मुखैः परितः परित्रातारं जगत्त्रयस्य भगवंतं मुकुंदं प्राशंसीत् ॥ पद्यम् ॥ मुकुंदनारायणमूलविद्या भवंतमाहुः परमार्थतत्वम् ॥ त्वत्तो हि सर्वो भविता प्रपंचः कुतो भयं तेऽप्यकुतो भयस्य ॥१६॥ मध्येसमुद्रं भ्रमतः सहोर्व्या मंथानशैलस्य गतो महिम्ना ॥ आधारतामच्युतकूर्मरूपी भवानहो नास्ति भवादृशोऽन्यः॥१७॥ महाप्रपंचो मदुपक्रमोऽयं त्वदीयशक्तेः परमाणुरेकः ॥ अगोचरं त्वां विकृते रथांगिन्नाद्यं पुमांसं कवयो वदंति ॥१८॥ युगे युगे त्वं विहितावतारो लोकानिमांत्रक्षसि लोकनाथः ॥ उपद्रवाद्रक्षसि दानवानां प-

---

रक्षण होईल? कारण नसतांच भयंकर प्रलय उत्पन्न झाला ह्मणावयाचा. असो, सर्व जगाचें रक्षण करण्याविषयीं हा नारायण मोठा धुरीण असतां काळजी कां करावी? परंतु नारायण देखील पळत सुटला आहे तर याला आपली शक्ति काय आहे हें समजत नसेल असें वाटतें, ह्मणून यःकश्चित प्राकृत मनुष्याप्रमाणें आपणही धांवत सुटला आहे. याकरितां प्रस्तुत जिकडे तिकडे पळत सुटलेल्या सर्व देवदैत्यांना हाक मारून अनेक उदाहरणें देऊन नारायणाला जागा करितों.(१६) याप्रमाणें ब्रह्मदेवानें आपल्या मनांत विचार करून अभय वचन देऊन इंद्रादि सर्व देवांना पुढें करून तिनी लोकांचें रक्षण करणारा भगवान अशा नारायणाची प्रशंसा ब्रह्मदेवानें केली. नारायणाला ह्मटलें कीं, हे मुकुंदा, नारायणा, मूलविद्या तूंच असून यथार्थतत्व ( परब्रह्मतत्व ) तूंच आहेस असें सांगतात, अशा तुझ्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें तर कोठेंही भय नसलेल्या तुला भय कोठलें बरें? (१७) समुद्राच्या मधोमध पृथ्वीसह गरगर फिरणाऱ्या या मंदर पर्वताला अच्युता तूं कूर्मरूप घेऊन आधार दिला आहेस, तर तुझ्यासारखा जगांत दुसरा कोणी नाहीं. (१८) हें सर्व जग माझ्या शक्तीनें उत्पन्न झालें आहे खरें परंतु तुझ्या शक्तींतील एक परमाणूची योग्यता माझ्या शक्तींत नाहीं. तूं कोणत्याही विकाराला गोचर होत नसून तूंच परपुरुष आहेस असें सर्व पंडित लोक सांगतात. (१९) प्रत्येक युगांत तूं अवतार घेऊन या सर्व लाकांचें रक्षण करतोस व सर्व दैत्यांच्या

रोपकाराय हि ते प्रवृत्तिः ॥१९॥ त्वन्नाभिपद्मादहमाविरासं त्वच्छक्तियोगाज्जगतोऽस्मि कर्ता ॥ त्वद्वासरे तावदहं शतायुस्त्वामाश्रये माधव विश्वमूर्ते ॥२०॥ समस्तसंरक्षणजागरूकं विना भवंतं विहगेंद्रकेतो ॥ को वा जगद्रक्षति कालकूटात्कातर्यतो नो भव कांदिशीकः ॥२१॥ विषानलक्रांतविवर्णदेहैः सहेंद्रपूर्वैः सकलैश्च देवैः ॥ पद्मासनेनेति कृतप्रशंसः प्रत्यावभाषे किल पद्मनाभः ॥२२॥ कृतिनो न वयं सरोजयोने गरलं सागरसंभवं गृहीतुम् ॥ स्तुतिभिः फलमद्य किं सुराणां विपदुत्तारकमीशमाश्रयामः ॥२३॥ भवत्पूर्वस्य विश्वस्य कर्ताहं कमलासन ॥ मम कर्ता महादेवो न कर्ता तस्य विद्यते ॥२४॥ यच्छक्तेः परमाणुरेष चिद्चिद्रूपः प्रपंचोऽखिलो यस्याज्ञामतिलंघितुं न सहते सर्वो विकारोऽपि नः ॥ यस्मिन्निर्मलनित्यमंगलगुणे नित्यं शिवाख्यं पदं तेनैव त्रिविलोचनेन सहसा सर्वे सनाथा वयम् ॥२५॥ शक्तिर्न

---

उपद्रवापासून देवांचें रक्षण करतोस, एकूण तुझी वागणूक परोपकाराकडे जास्त आहे. (२०) माधवा, तुझ्या नाभिकमलापासून मी उत्पन्न झालों. तुझ्याच शक्तीच्या प्रभावानें जगाचा कर्ता मी झालों. तुझा एक दिवस झाल्याबरोबर माझीं शंभर वर्षें भरतात, तर हे विश्वमूर्ते नारायणा, तुझा आश्रय मी करितों. (२१) गरुडध्वजा हे विष्णो, सर्व जगाचें रक्षण करण्याविषयीं नेहमीं जागा असलेल्या तुझ्याशिवाय या कालकूटाच्या भीतीपासून सोडवून आमचें रक्षण करणारा दुसरा कोण आहे बरें ? याकरितां विषाच्या भीतीनें दिशाभूल होऊं नकोस. (२२) विषाग्नीनें ज्यांचीं शरीरें होरपळून गेलीं आहेत, अशा इंद्रादि सर्व देवांसह ब्रह्मदेवानें नारायणाची प्रशंसा याप्रमाणें केल्याबरोबर तो पद्मनाभ याप्रमाणें बोलला. (२३) भो ब्रह्मदेवा, या समुद्रापासून उत्पन्न झालेल्या विषाचा स्वीकार करावयास आह्मी समर्थ नाहींत, या देवांनीं माझी स्तुति केली ती व्यर्थच आहे याकरितां सर्व संकटापासून सोडविणाऱ्या त्या श्रीशिवाचा आश्रय करूं चला. (२४) हे कमलासना, तूंच प्रभृति या जगाचा कर्ता मी आहे खरा परंतु माझा कर्ता ( उत्पन्न करणारा ) महादेव आहें त्याचा कर्ता मात्र कोणी नाहीं. (२५) चिदचिद्रूप हा प्रपंच ( जग ) सर्व ज्याच्या शक्तीचा एक परमाणु आहे. आमचे जे कांहीं विकार असतील ते त्याची आज्ञा मोडावयास समर्थ नाहींत. निर्मल व निरंतर मंगल गुण ज्याच्या ठिकाणीं भरले आहेत, तीच शिव परवस्तु होय. त्या शिवपरवस्तूमुळेंच आह्मी सनाथ आहोंत. (२६) देवहो, विनाकारण बोलून काय

मे संप्रति सागरोऽत्थं विषं गृहीतुं विबुधाः किमुक्त्या ॥ भवंति पुंसां परिहासमूलं कर्मण्यसाध्ये खलु वीरवादाः ॥२६॥ गीर्वाणवर्गैर्गणितैः किमन्यैः सर्वात्मना शक्तिकलाविहीनैः ॥ विना महादेवमनंतशक्तिं कः कालकूटं कवलीकरोति ॥२७॥ गद्यम् ॥ एवमभिहिते सर्वे सुपर्वाणः चतुराननेन सह तमेव पुरस्कृत्य सकलजगदभयंकरं शंकरमेव शरणार्थिनः तदावासं कैलासमुपागमन् ॥ पद्यम् ॥ यत्तटेषु शयनं विभाव्यते राजतेषु शिवयोर्विमोहनम् ॥ कुत्रचिद्धसितधूळिधूसरं क्वापि कुंकुमपरागपिंगलम् ॥२८॥ विधत्ते यः प्रभाजालैर्मृणालीतंतुबंधुभिः ॥ कर्पूरकर्णपूराभां कौबेराशामृगीदृशः ॥२९॥ अपचित्य तरुप्रांतात्तारकाः कोरकभ्रमात् ॥ किरंति यत्र नैर्गंध्याद्गंधर्वकुलकन्यकाः ॥३०॥ अधःसंचरदर्काणां यत्तटाग्रमहीरुहाम् ॥ छायालेषूर्ध्वभागेषु विश्राम्यंति विचराः ॥३१॥ स्फाटिके विशदे यस्मिन् वसंतः सर्वजंतवः ॥ पश्यं-

---

उपयोग आहे ! समुद्रापासून उद्भवलेलें विष घेण्यास मला विलकुल शक्ति नाहीं, असाध्यकर्म करण्याविषयीं कोणी एखादा आपला पराक्रम गाजवूं लागला तर तें त्याचें करणें अपहासाला कारण होतें. (२७) सर्वतः ज्यांची शक्ति नाहीं अशा इतर देवांना घेऊन काय करावयाचें आहे ! अपरिमित शक्तीच्या त्या महादेवाशिवाय कालकूट प्राशन करण्यास इतर कोण समर्थ आहे ? (२८) याप्रमाणें बोलत असतां सर्व देव ब्रह्मदेवासह विष्णूलाच पुढें करून सर्व जगाला अभय देणाऱ्या श्रीशंकराला शरण जाण्याकरितां त्याचें स्थान अशा कैलासाला निघून गेले. त्या रजतगिरीच्या एका प्रांतांत श्रीशिवाचें शयन दिसलें त्यावर एकेठिकाणीं भस्माचे कण पडले होते, व दुसऱ्या ठिकाणीं कुंकुमाचा तांबडेपणा दिसत होता. (२९) उत्तरेकडे राहणाऱ्या कुबेरपुरींतील स्त्रियांच्या कानांतील कापराच्या कर्णपूराप्रमाणें ( कानांतील दागिन्याप्रमाणें ) असलेल्या कमलाच्या देंठाप्रमाणें शुभ्र असलेल्या आपल्या कांतीच्या समूहानें तो पर्वत शोभत होता. (३०) ज्याठिकाणीं गंधर्वांच्या मुली झाडांच्या शेवटच्या टोंकावरून कोरक ( कळीच्या ) भ्रांतीनें तारा हातांत घेऊन त्या निर्गंध असल्यामुळें जिकडे तिकडे फेकीत होत्या त्याठिकाणीं हे देव गेले. (३१) बारासूर्य ज्यांच्या अधोभागीं संचार करीत होते, त्या वृक्षांच्या सावलींत सगळे आकाशांत संचार करणारे प्राणी विश्रांति घेत होते अशीं झाडें त्या कैलासपर्वतावर होतीं असें तात्पर्य आहे. (३२) त्यापर्वताच्या स्फटिकमय निर्मळ प्रदेशावर राहणारे सर्व प्राणी खालीं आधाराकरितां

त्याधारकूर्मस्य परिणाहमयत्नतः ॥३२॥ मंदारपुष्पकलिकामधुपानपी-
नमंदानिलास्तुलितमानसवीचिमालाः ॥ चुंबंति यत्र सुरतोत्सवडंब-
रेण स्विन्नानि किंनरविशालदृशां मुखानि ॥३३॥ गद्यम् ॥
तत्र ते कुत्रचिदाभोगे विचित्रसूत्राममणिशिलासूत्रितसुभगसोपानं
सुरभिमधुपानमदरसमांसलरिरंसुकलहंसमालावतंसकमनीयकनकक-
मलकदंबनितंबभरनिबिडनियतांतिकम् ॥ विहृतिलंपटकिंपुरुषनितं-
बिनीकठिनकुचकुंभमृगमदजंबालमेचकितविटपिषंडमुद्दंडविशदकुसु-
दामोदविवशमधुकरमधुरझंकारशृंखलितनिखिलनिजश्रवणं विशृंख-
लबलविपुलशंकरशक्वरविषमविषाणकूटकोटिपाटितनिकटमुत्कटवन-
करटिकटपुटनिर्गलदमंदबिंदुसंतानचंद्रकितसलिलं सलिलनिधिना-
पि याचितगांभीर्यं समष्टिमिव सलिलसृष्टेरुन्मृष्टकलमौक्तिकादर्शस्व-
च्छमच्छोदाभिधानमपांनिधानं समालोकयन् ॥ पद्यम् ॥ फुल्लाभिजा-

---

राहिलेल्या कूर्माचा विस्तार किती आहे तें सहज पाहत होते. (३३) त्या कैला-
सावर मानससरोवराच्या लाटांवरून येणारा व मंदारपुष्पांतील मकरंद घेऊन
पुष्ट झालेला मंदमारुत हा सुरतोत्सवानें वामाळु झालेल्या किंनर स्त्रियांचें मुख
चुंबीत होता. (३४) त्या कैलासामध्यें कोणे एके विस्तृत ठिकाणीं इंद्रनीलमणि-
खचित पायऱ्या चमकत होत्या. त्या पायऱ्याच्या कडेला पाण्यांमध्यें मकरंदपा-
नानें मस्त झालेले कलहंसपक्षी सुंदर सुंदर कमलांच्या मध्यप्रदेशाभोंवतीं दाट-
पणें जमून खेळत होते. त्यामुळें व सुवर्ण कमळें पुष्कळ असल्यामुळें विशेषेंकरून
शोभा आलीं होती. आणि खेळण्यांत लंपट असलेल्या किंपुरुषांच्या स्त्रियांच्या
स्तनावरच्या कस्तूरीनें सुंगधमय झालेलीं अनेक झाडें काळीं होऊन पाण्याच्या
कडेला दिसत होतीं. भरभराटीनें वाढलेल्या निर्मळ कमळाच्या सुगंधाला भुलून
आलेल्या भुंग्यांच्या झंकारानें पाण्याचा आवाज लुप्त झाला होता. आणि श्रीशं-
कराचें वाहन असा महाबलाढ्य नंदी सुटल्यामुळें आपल्या शिंगांनीं पर्वतावरील
सुळे पाडून यथेच्छ फिरत होता त्यामुळें कांठांवर दगड फार पडले होते. उन्मत्त
झालेले हत्तीच्या गंडस्थळांतून स्रवणारा मद पाण्यांत मिसळल्यामुळें पाणी ठिक-
ठिकाणीं गढूळ दिसत होतें. मोठमोठे समुद्रांनीं देखील याच्या गांभीर्याला
पाहून आपले हात टेकले होते. पाण्याची सर्व सृष्टि प्रथम येथेंच झाली असेल
काय ? असें दिसत होतें. उत्कृष्ट मोत्यांच्या आरशाप्रमाणें निर्मळ असलेलें असें
एक अच्छोद नांवाचें सरोवर सर्व देवांनीं पाहिलें देव तेथें गेल्यावरोबर त्या

तकुमुदोत्पलपुंडरीककल्हारसौरभघनैः कलधौतशैलः ॥ आर्तिं विषार्तमनसा महरत्सुराणामच्छोदवीचिनिचयच्छुरितैः समीरैः ॥३४॥ गद्यम् ॥ तस्य ते सपदि नातिदूर एव वसंतकंदलितकुंदमंदारकनककदंबपनसपाटलपूगपुंनागनारिकेळजंवूजंवीरतमालमालतीभूर्जखर्जूरधातकीकेतकिप्रमुखतरुषंडमंडितं विविधलतामंडपविहरणनिपुणचारणमिथुननिधुवनारंभपरिरंभचटुलकरकंकणझणत्कारनिपुणं शिखरिपरिसरविहृतिलंपटमृडविकटमुकुटहिमरुचिमरीचिपरिचयविलीनचंद्रकांतशिलातलप्रांतनिष्यंदपूरधारावसरनिविडनिवद्धमुग्धकिसलयवलयकंचुकिततरुसंचयं पंचशरं वंचनासुहृदभिनवयौवनमदांधगंधर्वयुवतीमुखकमलमधुरस गंडूषसंचूषणसमुन्मिषितकुलतरुमंजरीपरिमिलितकलचंचरीककलकलकल्लोलितमुल्लोलपल्लवपरिकरचूडालचूतपूतशिखरनिकराधिरूढप्रौढकलकंठजयडिंडिमनिनदचंडिमतांडवि-

---

रजत पर्वतावर ( कैलासावर ) असलेल्या अच्छोदसरोवरांत असलेल्या व फुललेल्या कुमुद, उत्पल, पुंडरीक, कल्हार यांच्या सुगंधानें पुष्ट झालेल्या व त्यासरोवरांतील लाटांच्या पाण्याला स्पर्श केलेल्या मंदमारुताच्या योगानें कालकूट विषाच्या वाधेपासून मुक्त झाले (३५) त्या सरोवराच्या जवळच तात्काळ वसंतकालामुळें फुललेलीं कुंद, मंदार, सोनचांफा, कळंव, फणस, पाटल, सुपारी, पुन्नाग, नारळ, जांभूळ, जंवीर तमाल, मालती, भूर्ज, खजूर, आंवळा केतकी, वगैरे झाडें जेथें सुशोभित होऊन दिसत होतीं, अनेक तऱ्हेच्या लतामण्डपांत क्रीडा करावयास आलेल्या चारणदंपतीच्या आलिंगनामुळें स्त्रियांच्या हातांतील कांकणें झणत्कार जेथें करीत होतीं, व त्या पर्वतावर सभोंवती क्रीडा करणाऱ्या श्रीशिवाच्या किरीटावर शोभणाऱ्या चंद्रमाच्या किरणांनीं चंद्रकांत शिळांच्या तटावरून सारखें पाणी गळत असल्यामुळें त्या पाण्याच्या धारा बुडापर्यंत जात होत्या ह्मणून कोंवळी कोंवळी पालवी फुटून हिरवी गार दिसत असलेलीं अनेक झाडें जेथें दिसत होतीं. व फसविण्याच्या कामांत मदत करणारा कामाचा मित्र ह्मणजे नूतन तारुण्य होय. या तारुण्याच्या मदानें अंध झालेल्या गंधर्वांच्या तरुण स्त्रियांच्या मुखकमलांतून निघालेल्या मधुरसाच्या गंडूषानें ( गुळण्यानें ) फुललेल्या कुलवृक्षाच्या मंजरींतील सुगंधाला लुब्ध होऊन आलेल्या मधुकराच्या झंकारांनीं युक्त असलेलें, व इकडे तिकडे ज्याचीं पानें हालत आहेत, अशा निविड ( दाट ) आम्राईंत आंब्याच्या झाडाच्या शेवटच्या उंच फांदीवर वसून मंजुळ आवाज

तमन्मथकलाप्रकांडं रतिरसपंडितधनदपुरवर्णिनीकर्णिकाभरणीकृतकर्णिकारकलिकाकलापं सुभगालापिगुहकलापिकुलसंतानचरणसंताडितस्थलकमलपर्यस्तमधुरसकुल्यामनोहरोपशल्यं निरपायशल्यकल्याणपरमयोगिपरिगृहीतपर्यंतमणिशिलाभवनं प्रतिनवकुसुमापचयगर्वपारीणपार्वतीपरिचारिकाचरणपल्लवझणझणायमानमणिनूपुरवाचालं वाचामगोचरविभवनिर्देशापनोद्देशं प्रविशन् ॥ पद्यम् ॥ पुरं तत्रपुराराते: परिस्फुरितगोपुरम् ॥ ददृशुस्ते लगन्नारीपदक्कणितनूपुरम् ॥३५॥ यत्र माणिक्यहर्म्याणां प्रभावलयकोरकैः ॥ पुरुहूतधनुःपुंजपंजरस्थमिवांबरम् ॥३६॥ यत्र सारंगनेत्राणां गतिविभ्रमवांछया ॥ हंसाः पद्मासनारूढास्तपस्यंतीव मानसे ॥३७॥ आरामतरवो यस्मिन्नभीष्टफलदायिनः ॥ जलं च लीलावापीषु जरामरणभेषजम्॥३८॥अणिमादिकमैश्वर्यं यस्यां सिध्यति वासिनाम् ॥ ब्रह्मादयः सुरायेषामा-

---

काढणाऱ्या कोकिलांच्या कलकलाटामुळें हातांत कोकिलाचा आवाजरूप टाळ घेऊन मन्मथ जेथें नाचतो कीं काय असें दिसत होतें. व रतिसुख देण्यांत चतुर अशा अलकावतीच्या वायका कानांत बुगड्या काप घालून जेथें फिरत होत्या. सुंदर आवाज काढणाऱ्या मोरांच्या पायाच्या मारामुळें आस्ताव्यस्त झालेल्या कमलांतील सुगंध जेथें सुटला होता, व जेथें परमानंदांत असलेले मोठमोठे योगीश्वर मणिमय ( रत्नखचित ) प्रासादावर ( माडीच्या घरांत ) राहत होते, प्रतिदिवशीं फुलें वेंचण्यांत गर्व बाळगणाऱ्या पार्वतीच्या दासींच्या पायांतील नूपुरें जेथें वाजत होतीं, व जेथल्या ऐश्वर्याचें वर्णन वाणीनें करवत नसे त्या शहरांत देवांनीं प्रवेश केला. गोपुरें जेथें चमकत आहेत, स्त्रियांच्या पायांतील नूपुरांचा आवाज जेथें ऐकावयास येत होता अशा त्या श्रीशिवाच्या राजधानींत देवांनीं प्रवेश केला. (३६) त्या राजधानींत असलेल्या रत्नखचित प्रासादाच्या कळीवर दिसणारें आकाश इंद्राच्या धनुष्याच्या राशीवर असलेल्या आकाशाप्रमाणें दिसत होतें. (३७) त्या राजधानींतल्या स्त्रियांच्या विलासाच्या गति पाहून लाजून पद्मासनावर वसून सर्व हंस मानससरोवराच्या कांठीं तपश्चर्येला बसले आहेत कीं काय असें दिसत होतें. (३८) त्या राजधानींत सभोंवतीं असलेल्या बागेमधील वृक्ष इच्छितवस्तु देणारे होते. आणि त्या बागेंत असलेल्या विहिरींतील पाणी कोण पिईल त्याला मरण आणि म्हातारपण येत नसे. (३९) त्या शहरांत राहणाऱ्या प्राण्याला अणिमादि ऐश्वर्य सहज मिळत होतें आणि त्या पुरवासी लोकांचा हु-

ञ्चालंघनभीरवः ॥३९॥ येषामानंदकणिकास्वाराज्यपदसंपदः ॥ जरामरणकार्पण्या चिंता येषां न गोचरा ॥४०॥ गद्यम् ॥ तत्र ते विचित्रमणिसंस्तंभितया तुंगया पुंगवपताकया दूरतोऽपि लक्ष्यमाणचतुर्द्वारमणिगोपुरं मातृकापुरमिव त्रिभुवनभुवननिर्माणस्य स्फटिकमणिविरचितबहुप्राकारवलयप्रभापूरपरिगतपर्यंततया पूर्वमेव सुपर्वणामुपागत्य स्वमथनायासविज्ञापनावसरं देवस्य परिपालयता पयःपारावारेणेव परिगतं प्रथमद्वारपर्यंतवेदिकाविनिवेशितविपुलमणिकलशतया भक्तिवशेन चंद्रसूर्याभ्यामेव प्रतिपन्नद्वारपालकृत्यमत्युन्नताभिलंघनमहापराधादिव नभश्चरयानक्षत्रमालया परिहृतविमानोपरिगताभिः परिगलितजलधरपथाभिरपि पशुपतिमुकुटशिखामणिकिरणवित्स्फुरणविलीनशशिमणिभित्तिनिर्मुक्तसलिलपूरपूरितप्रनालिकाभिः पवनवशपरिकंप्यमानविविधध्वजपटपटलतया पशुपतिभजनाय दिवि च-

---

कूम तोडण्यास ब्रह्मादिदेव देखील भीत होते. (४०) तेथले लोक स्वराज्याच्या अधिकारसंपत्तीच्या आनंदांत बुडाले होते, व त्यांना ह्मातारपण, मरण, दैन्य यांची काळजी स्वप्नांत देखील नव्हती. (४१) अशा त्या शहरांत चित्रविचित्र रत्नांनीं खचित झालेल्या उंचउंच काठीवर आडकविलेल्या श्रेष्ठश्रेष्ठ नंदिध्वजांनीं दुरून देखील चार दारांचें रत्नखचित गोपुर दिसत होतें. त्रिभुवनाच्या निर्माणाचें माहेरघर आहे कीं, काय असें भासत असलेलें, व स्फटिकांनीं व रत्नांनीं निर्माण केलेल्या प्रासादांच्या कंकणाकृतीचें तेज फार दूरवर फांकलें होतें त्यामुळें घुसळल्यानें अतिशय श्रम झाला आहे अशी विज्ञापना करण्याकरितां देवांच्या अगोदरच येऊन श्रीशिवाची वाट पाहत तो समुद्र वसला आहे कीं काय ? असा त्रास जेथें होत होता, व पहिल्यादारापर्यंत ओट्यावर रत्नमय कळशी ठेविल्यामुळें भक्तिपरवश होऊन चंद्रसूर्यांनीं द्वारपालाचें काम स्वीकारिलें कीं काय असें दिसत होतें. आकाशांत फिरणाऱ्या तारा अतिशय उंच गेल्या आहेत, हाच मोठा अपराध त्यांनीं केला ह्मणूनच कीं काय विमानाच्या मार्गापेक्षां वरवर प्रासाद उंचउंच जेथें गेले होते. त्या प्रासादांवर अभ्रें तुटून पडत होतीं, आणि साक्षात श्रीपशुपतीच्या मुकुटांतील चंद्राच्या किरणांनीं चंद्रकांत मण्याच्या भिंतीपासून सतत पाणी गळत असल्यामुळें तें पाणी प्रासादावर लावलेल्या पिचकारींतून मोठ्या प्रवाहाच्या रूपानें बाहेर धो धों अवाज करीत पडत होतें. त्या प्रा-

रगणानाव्हयंतीभिरिव नर्तयंतीभिरिव मोक्षलक्ष्मीं तर्जयंतीभिरिव पादपदेवतां विविधवितानपटलघटितानिस्तुलस्थूलमुक्ताफलसंदोह-दंतुरतया कोमलमणिरचितगोपानसीकूटनीडक्रीडाकुलशुककुलसंगीयमानशंकरचरितरसामोदेन मुकुलितपुलकबहुलाभिरिव पाटलमणिमयप्रदीपमालया पशुपतिकरकमलगतहुतवहसंततिपरंपरयैव प्रकाशमानाभिः परशतसंख्याभिः प्रासादमालाभिः परिशोभमानं परिसर-कनककमलमकरंदपानतुंदिलभ्रमरमंदपरिस्यंदसंततशीतलतया तत इतः स्थापितशतसहस्रशातकुंभस्तंभसंभाविताभिर्विविधरूपप्रपंचि-काभिः सालभंजिकाभिस्त्रिभुवनजनमूलप्रकृतिभिरिव विद्योतमानया विकटोन्मत्तविमलक्षुद्रविद्रुमतोरणकिरणविसरणमिलितेन परितः प्रा-लंबमानधवलचामररुचिकलापेन परिसंभावितवापिकाकमलकुमुदार्ध मुग्धवासितकरं सततमपि चंद्रिकावालातपव्यतिकरं विदधानया स-

---

सादावर पताका लावल्या होत्या त्या वाऱ्यानें हालत असल्यामुळें श्रीपशुपतीच्या भजनाला सर्व देवांना बोलावीत आहेत कीं काय असें दिसत होतें. किंवा ते प्रासाद मोक्षलक्ष्मीला नाचविताहेत कीं काय असें दिसत होतें. वृक्ष देवतेला तर्जन ( पीडा ) करतात कीं, काय याप्रमाणें दिसत होते· त्या प्रासादावर नाना तऱ्हेचीं छतें मारिलेलीं असल्यामुळें त्यांच्या सभोंवतालच्या झालरी मोत्यांच्या लोंवत सोडलेल्या असल्यामुळें आणि लहान लहान रत्नांचीं त्या प्रासादावर पक्षी बसण्याकरितां घरटीं केलीं होतीं त्या वलभीमध्यें ( पक्षी बसण्या करितां केलेल्या जागेमध्यें ) शुक वगैरे पक्षी मंजुळ आवाज काढून खेळत होते, आणि श्रीशंकराचें चरित्र गात होते. त्यामुळें त्या प्रासादाला रोमांच उद्भवले कीं काय असें दिसत होतें. तांबडी लाल दीपांची माळ तेथें असल्यामुळें श्रीपशुपतीच्या हातांतल्या अग्नीच्या पंक्तीप्रमाणें ते प्रासाद तेजस्वी दिसत होते, अशा तऱ्हेच्या हजारो शेंकडो प्रासादांनीं तेथलें तें गोपुर शोभत होतें, व सोन्यासारखीं असलेल्या कमलांतील मकरंदाच्या पानानें पोटाळु झालेल्या भुंग्यांच्या मंदगतीनें शीतल झाल्यामुळें ( थंड झाल्यामुळें ) व इकडे स्थापन केलेल्या शेंकडो हजारो सोन्याच्या खांबांनीं सुशोभित दिसणाऱ्या, अनेक तऱ्हेच्या रूपांनीं ( आकृतींनीं ) विस्तृत दिसणाऱ्या भावलींनीं त्रैलोक्यांतील लोकांच्या मूल प्रकृतीप्रमाणें शोभणाऱ्या, व बारीक पोंवळ्यांचीं तोरणें तेथें असल्यामुळें त्या तोरणांचीं किरणें भ-

मुल्लसितराजहंसयुगलेन समतलामुक्तमुक्ताफलनिकरतारेण पृथुलमणिमयादर्शसुदर्शनेन निर्मृष्टधवळघनमनोहरेण शरदंबरेण सागरांबरयेव वितर्तेन वितानांबरेण विभ्राजमानया निविडवैडूर्यविरचितसोपानसंपन्नरोहावरोहया प्रचंडया मणिपरंपरया मंडितप्रांतं कौमुदीमयमिव कलधौतधौतप्रभाकंदलीभिः संध्यारागमयमिव मंगलमयपद्मरागप्रभाभिः बालातपमयमिव शातकुंभस्तंभरुचिभिस्तिमिरमयमिव शतमखमणिमयभित्तिछायाभिः महेंद्रचापमयमिव नानामणिच्छविव्यतिकरेण नवजलधरध्वानमयमिव निरवद्यवाद्यनिनदयौगपद्येन मधुरिममयमिव मंगळसंगीतभृंगिकाभिः शृंगारमयमिव तत इतः संचरंतीनामंबिकापरिचारिकाणां तरळमणिताटंकरंगलासिकाभिः अपांगवलनविभ्रमकलाभिः सौरभमयमिव विहारोपवनतरुकुसुममंजरीमधुर-

---

यंकर असून निर्मळ होतीं अशा त्या किरणांच्या मिश्रणानें युक्त चोहोंकडे लोंबत सोडलेल्या शुभ्र चामरांच्या तेजाच्या समूहानें सुशोभित दिसणाऱ्या विहिरींतील कमलांच्या व कुमुदांच्या सुगंधानें तें गोपुर सुवासित झालें होतें. चंद्राचीं कोवळीं किरणें व बालसूर्याचीं किरणें धारण केलीं कीं काय याप्रमाणें दिसणाऱ्या, व शोभणारी राजहंसांची जोडी तेथें असल्यामुळें जागजागीं मोत्यांची रास पडलेली दिसत होती, व मोठ्या रत्नांच्या आरशाप्रमाणें दिसणाऱ्या, व चोहोंकडे शुभ्र आभाळ पसरल्यामुळें सुंदर दिसणाऱ्या शरत्कालच्या आकाशानें युक्त पृथ्वीप्रमाणें पसरलेल्या छतानें शोभणाऱ्या, व दाटपणें चोहोंकडे वैडूर्यांनीं खचित झालेल्या चढण्या उतरण्याच्या पायऱ्यांनीं युक्त अशा प्रचंड मणिपरंपरेनें चोहोंकडे तें गोपुर सुशोभित दिसत होतें, व चांदण्याप्रमाणें दिसणाऱ्या चांदीच्या प्रासादांच्या शुभ्रकांतीनें, व संध्याकाळच्या तांबड्या रंगाप्रमाणें असलेल्या मंगलकर पद्मरागाच्या कांतीनें, व सूर्याच्या कोंवळ्या किरणाप्रमाणें असलेल्या सोन्याच्या खांबांच्या कांतीनें, व गडद अंधाराप्रमाणें असलेल्या इंद्रनिल मण्यांच्या भिंतींच्या कांतीनें, व इंद्रधनुष्याप्रमाणें असलेल्या अनेक तऱ्हेच्या रत्नांच्या कांतीनें, व नवीन मेघांच्या गडगडाटाप्रमाणें एकवटून एकदम शब्द करणाऱ्या दोषरहित अनेक तऱ्हेच्या वाद्यांनीं, व भुंग्यांच्या झंकाराप्रमाणें ऐकावयास येत असलेल्या मंगळकर संगीतांच्या आवाजांनीं, शृंगारमयाप्रमाणें इकडे तिकडे फिरत असलेल्या पार्वतीच्या दासींच्या कानांतील रत्नांच्या बुगड्या हालण्यानें, आणि त्या दासींच्या विलासानें फिरविण्यांत येणाऱ्या वांकड्या भिंवयांनीं सुगंधमया-

शरीभिः परमयोगिभिः कैवल्यमयमिव समाप्तसकलसिद्धवृद्धैः परमाश्चर्यनिदानभूमिं पशुपतेः प्रमितिविषयप्रमातिक्रांतं शुद्धांतं प्रापश्यन् ॥ तस्य च करकलितकनकदंडाभ्यां चंडप्रचंडाभ्यामधिष्ठिते प्रथमगोपुरद्वारे संभूय शतानंदमुकुंदादयः सर्वे सुपर्वाणः समुद्यतभुजं महेशं प्रत्याक्रोशमकुर्वन् ॥ जय जय महादेव स्वामिन् प्रसीद प्रसीद ॥पद्यम्॥ अस्माभिर्मथितः सिंधुरमृतोत्पत्तिलिप्सया ॥ कालकूटः समुत्पन्नः कबलीकुरुतेऽद्य नः ॥४१॥ कोलाहलेन बहुना किमशेषबंधो हालाहलेन जलधेर्वयमात्तसाराः ॥ मृत्योरकांडमधुना विषयीभवामो मृत्युंजयाशु परिपालय नः प्रपन्नान् ॥४२॥ गद्यम् ॥ इति दिविषदाक्रोशमाकर्ण्य कर्णपरुषं दौवारिकाणामादिः शैलादिः सरभसमादिभिषजमंतःपुरसभागतं देवमुपसृत्य प्रणम्यैवमवसरज्ञो विज्ञापयामास ॥ देव जलधिजनुषा केन चिद्विषविशेषेण कवलीकृतजीवा देवाः कमलभुवं कमलनयनं

---

प्रमाणें क्रीडावनांतील वृक्षांच्या मंजरींतील सुगंधांनीं या सर्वांनीं युक्त व श्रेष्ठ श्रेष्ठ योग्यांनीं युक्त असलेल्या कैवल्याप्रमाणें दिसणारे, सर्व ज्ञातारे ज्ञातारे सिद्धांच्या योगानें आश्चर्ययुक्त जमीन असलेलें, व अपरिमित उंच असलेलें असें पशुपतीचें शुद्धांत ( गोपुर ) त्या देवांनीं पाहिलें. त्या गोपुराच्या पहिल्या दारांत सोन्याची काठी हातांत घेऊन चंडप्रचंड नांवाचे दोघे द्वारपाल उभे होते. त्या पहिल्या दारांत शतानंद, मुकुंद वगैरे सर्व देव जमून वर हात उचलून श्रीमहादेवाचें नांव घेऊन ओरडूं लागले. व आक्रोश करूं लागले. महादेवा, तुझा जयजयकार असो.प्रभो प्रसन्न हो. प्रसन्न हो. हे देवा,अमृत काढण्याच्या इच्छेनें आह्मी समुद्र घुसळला, तर त्यापासून अमृत न निघतां कालकूट विष निघून आह्मां सर्वांना जाळीत आहे. (४२) भो जगद्बंधो, विनाकारण आक्रोश करण्यांत काय अर्थ आहे ? समुद्रांतील त्या विषाच्या योगानें आह्मी सर्व हतवीर्य झालों आहोंत फार काय ? आह्मी सर्व मृत्यूच्या तावडींत सांपडलों आहोंत तर या मृत्यूपासून हे मृत्युंजया शरण आलेल्या आमचें रक्षण कर. (४३) याप्रमाणें कर्णकठोर देवांचा आक्रोश ऐकून द्वारपालांमध्यें श्रेष्ठ व समय जाणणाऱ्या नंदिकेश्वरानें अतिशय वेगानें अंतःपुरांत बसलेल्या महावैद्याजवळ येऊन नमस्कार करून समयानुसार विनंति केली, महाराज, समुद्रांत उत्पन्न झालेल्या कोण्याएका तीक्ष्ण विषाच्या त्रासानें ज़ीव घाबरा होऊन सर्व देव ब्रह्मदेवाला व विष्णूला पुढें करून

च पुरोधाय द्वारभुवि शरणार्थिनः समाक्रोशंति ॥ कीदृशो वा देवस्य कृपावसर इति तदाकर्ण्य तूर्णं प्रवेशयतानिति तमादिदेश विबुधदेशिकः ॥ ततस्तु तदाज्ञया तेन सरभसमंतःप्रवेशितास्ते सुरपतयः ॥ तत्र विचित्रमणिगणविरचिते महति सभामंडपे चंडतरविशदस्फटिकमणिघटिततया सकलभुवनधर्मसारैरिव निर्मितं पदकमलस्पर्शभागधेयेन मुकुटतटाधिरोहमहापातकमुपशमयितुमासनतामुपेयिवांसमिव चंद्रमसं परिसरमणिस्तंभावष्टंभमूलसंभृतसितमणिमहावराहप्रतिमासंक्रांतिभासुरांतरतया निरायासेन पदकमलदर्शनाय परिभ्रमता पातालविवरादिव वराहेण कृतानुप्रवेशं प्रणतसुरासुरनिकरशेखरपालिधूलिधाराभिषेकनिर्निद्रवासनं भद्रासनमधिवसंतं पर्यंतमणिस्तंभसंभारेषु मणिकुट्टिमेषु वितानमौक्तिकेषु परिसरवर्तिनां परिवारग-

---

घेऊन आपल्या दारापाशीं शरणार्थी (संरक्षण कर्त्याच्या इच्छेनें) होऊन आक्रोश करूं लागले आहेत. सद्यःकृपा करण्याला आपल्याला वेळ आहे किंवा दुसरी वेळ आहे तें सांगा, असें त्याचें वाक्य ऐकून देवश्रेष्ठ श्रीशिवांनीं ह्मटलें कीं, त्यांना लौकर आंत घेऊन ये. अशी आज्ञा ऐकून जलदीनें जाऊन त्या सर्व देवांना अंतःपुरांत आणून सोडिलें. त्याठिकाणीं चित्रविचित्र रत्नांनीं निर्माण केलेल्या मोठ्या सभामंडपांत प्रचंड निर्मळ स्फटिकमण्यांनीं रचलेलें असल्यामुळें सर्व जगांतील धर्माच्या सारांनींच रचल्याप्रणाणें जें दिसत होतें, व ईश्वराच्या किरीटावर चढून बसल्यामुळें महापातकें आपल्याला प्राप्त झालीं आहेत, तीं ईश्वराच्या पायाचा स्पर्श होऊन जावींत ह्मणून चंद्रानें आपण स्वतः आसनपणा पत्करिला कीं काय याप्रमाणें दिसणारें (तें भद्रासन चंद्राकार होतें असें तात्पर्य आहे) जवळ असलेल्या रत्नमय खांबाच्या मुळाशीं शुभ्र मण्याच्या महावराहाच्या प्रतिमा केल्या होत्या (खांबाच्या बुडाशीं तळखडे ठेविले होते ते महावराहाच्या आकृतीचे केले होते) त्यांची कांति त्या रत्नांत मिसळून पडल्यामुळें विन आयासानें आपल्यास श्रीशिवाचे पाय दृष्टीस पडावेत ह्मणूनच कीं काय पाताळाच्या विवरांतून आदिवराह येऊन तेथें बसला आहे असें दिसत होतें. व देवदैत्य वगैरे नमस्कार केल्यामुळें त्याच्या किरीटांवरील धुळीच्या धारांचा अभिषेक घेण्याकरितां नेहमीं जागेपणानें असलेल्या अशा भद्रासनावर बसलेल्या, व रत्नखचित खांबामध्यें व रत्नखचित भिंतीमध्यें व छताच्या झालरीच्या मोत्यामध्यें, व जवळ असलेल्या परिवारांच्या निर्मळ तेजस्वी शरीरांमध्यें त्याचें शरीर (शिवाचें शरीर) प्रति-

णानां विशदरुचिषु विग्रहेषु च प्रतिबिंबितनिजतनुतया सकलचिदंतर्यामिणमात्मानमिव साक्षात्प्रकाशयंतं संततमुपांतगतसुरवधूकरविधूयमानेन धवलचामरयुगलेन मुकुटनिकटमंदिरमंदारमंदाकिनीपरिसराधिवासमुत्कांठितया परिभ्रमता हंसमिथुनेनेव मुहुरभितचूडापरिसरविकटपाटलजटाजूटरुचिनिचिततया नीरंध्रसंध्यारागपुंजपंजरगतेनेव मुकुटतटसमारोहणमहापातकादिव परिक्षीणेन सुरसरिदुपकंठशुक्तिखंडानुकारिणार्धचंद्रेण वर्धितचूडामणिरामणीयकं दिनमणिसहस्रकोटिभिरिव घटितवपुषं तेजोऽतिशयेन प्रलयसमयहुतवहप्रपंचैकाहुतिकहुतवहाधानकुंडेन मंडितललाटं नयनपुंडरीकेण वदनशशिमंडलानुगतगुरुकाव्यगौरवावहस्य स्फटिकमणिकुंडलयुगलस्य दीधितिदंडकाभिः करतलकुण्डाहितस्य हुतवहशिशोः पयआहुतिपरंपरा इव पातयंतं कंठमूलगतकालिमकालांधकारस्य विडम्बनाय कौमुदीकदंबमिव संपादयंतमंबिकाकुचकलशकुंकुमपंकमुद्रिकामुरसि शृंगारदेव-

---

बिंबाच्या रूपानें पडल्यामुळें सर्व चिदंतर्यामी आत्म्याला प्रत्यक्षपणें दाखवितो कीं काय याप्रमाणें दिसणाऱ्या, व निरंतर जवळ राहिलेल्या सुर स्त्रियांच्या हातांनीं वारण्यांत येणाऱ्या शुभ्र चामरांच्या जोडीनें किरीटाच्या प्रांतभागावर असलेल्या मंदाकिनीच्या जवळ वास करून उत्कंठेनें फिरणाऱ्या हंसाच्या जोडीनें, व केशपाशाजवळ भयंकर तांबड्या जटासमूहांच्या कांतीनें छिद्र नसलेल्या संध्येच्या आरक्ततेप्रमाणें दिसणाऱ्या तेजानें मुकटाच्या तटापर्यंत चढलेल्या महापातकाप्रमाणें क्षीण झालेल्या भागीरथीच्या कांठावर असलेल्या शिंपीच्या तुकड्या प्रमाणें दिसणाऱ्या चंद्रानें शिरोरत्नाचा सुंदरपणा वाढविलेला, कोट्यावधि सूर्य एकत्र जमवून निर्माण केल्याप्रमाणें शरीर असलेला, व अतिशय तेजानें प्रळयकाळांतील अग्नीच्या आहुति घालावयाच्या अग्निकुंडाप्रमाणें दिसणाऱ्या पुंडरीकाप्रमाणें शोभणाऱ्या नेत्राग्नीनें शोभणारें कपाळ असणाऱ्या, चंद्रमंडलाप्रमाणें शोभणाऱ्या मुखावर बृहस्पति आणि शुक्र या ताऱ्यांप्रमाणें चमकणारीं स्फटिकमण्यांचीं कर्णकुंडलें धारण केल्यामुळें त्यांच्या दंडाकार कांतीमुळें करतलावर असलेल्या बालाग्नीच्या ठिकाणीं क्षीराच्या आहुति घालतो कीं काय याप्रमाणें दिसणाऱ्या, व कंठमूलाच्या ठिकाणीं असलेल्या काळ्या काळांधकाराच्या नाशाकरितां कर्णकुंडलांची कांति चांदण्याप्रमाणें संपादन करणाऱ्या व अंबिकेच्या स्तनकलशावर रेखिलेल्या केशराच्या चित्रांला आपल्या उरावर शृंगार देवतेच्या साम्राज्याच्या शासनमुद्रे-

तासाम्राज्यशासनलिंगमिव दधानं परिधानचमत्कृतभद्रासनपद्मरागप्रभारंजिततया पट्टांशुकनिर्विशेषनिःशेषभुवनरक्षायूपानुकारिभिः वलयकेयूरमालायमानफणिपतिफणामणिमरीचिनिचिततया पल्लवितपारिजातविटपाभिश्चतुर्भिरपि बाहुभिरभिशोभितं कुलिशकठिनकीनाशतनुमथनायाससहनादिव मुनिजनहृदयकमलकिंजल्करंजनादिव प्रणतजनपातनप्रकोपादिव पाटलाभ्यां वरनखरुचिनिचयव्याजेन निजदर्शनविफलोत्साहमादिवराहमिव परिहसद्भ्यां भक्तजनमनस्तमसो निबर्हणाय चंद्रिकासर्गसंरंभमिव तन्वानाभ्यां पादकमलाभ्यां परिद्योतमानं बलमथनमणिविहितमंजरीकिरणपुंजकंचुकितचरणपीठपरिसरतया त्रिदशांतरनिर्विशेषधिया परिभवितुं सरभसमभ्यागतयानुभावभीतया कालकूटदेवतयेव प्रणम्यमानं निजपीठमाधिवसंत्या निखिलभुवनमातृकायाः कोमलकुवलयशामलायाः कुचभुवि गौर्या विहारमणिसं-

---

प्रमाणें धारण करणाऱ्या, व वरच्या अभ्र्यानें (वरझांकावयाच्या वस्त्रानें) चमत्कार दिसणाऱ्या भद्रासनावरील पद्मरागाच्या प्रभेनें रंजित झाल्यामुळें व पट्टवस्त्रें आंगावर घेतल्यामुळें त्रिभुवनाचें रक्षण करावयाचें अनुकरण करणाऱ्या सांबाप्रमाणें शोभणाऱ्या व कंकण, बाहुभूषण, मालाकार वेढा घातलेल्या महाशेष यांच्या रत्नांच्या तेजानें अंकुर फुटलेल्या पारिजाताच्या फांदीप्रमाणें दिसणाऱ्या चार बाहूंनीं सुशोभित दिसत असलेला, व वज्रापेक्षां कठिण असलेल्या यमाच्या शरीराचें मथन केल्यामुळें झालेल्या श्रमाचें सहन करितो कीं काय याप्रमाणें दिसणाऱ्या, मुनिजनांच्या हृदयकमलांतील केसरांच्या शोभेप्रमाणें, व नम्र झालेल्या लोकांच्या अतिशय नमस्कारांनीं तांबडे लाल झालेल्या व श्रेष्ठ नखांच्या कांतीच्या निमित्तानें आपल्या दर्शनाच्या योगानें निष्फळ झालेल्या उत्साहानें युक्त अशा आदिवराहाला हंसतात कीं काय याप्रमाणें दिसणाऱ्या व भक्तजनांच्या मनांतील अज्ञान घालविण्याकरितां उद्भूत झालेल्या चांदण्याच्या संरंभा प्रमाणें अनुकरण करणाऱ्या, पादकमलांनीं शोभणारा, इंद्रनीलमण्यांनीं शिवाचें चरण पीठ केलें होतें अर्थात तें काळें होतें. यावरून असें दिसत होतें कीं कालकूटदेवता ही श्रीशिवाच्या पायाजवळ येऊन शिवाचाही पराभव इतर देवांप्रमाणें करावा ह्मणून आली कीं काय असें दिसत होतें, परंतु जवळ आल्यामुळें शिवाचा प्रभाव जाणून त्याप्रभूला तीच देवता नमस्कार करते कीं काय याप्रमाणें दिसत होतें. व निजपीठावर वास करणाऱ्या, सकल जगाला मातेप्रमाणें असलेल्या, कोमल कमला

क्रांतनिजप्रतिकृतिफलेन सरसपरिरंभसंभ्रमविलीनमात्मानमिव प्रक- टयंतं पर्यंतसंततसांनिविष्टसेवाहावाकररसिकसरसपरमयोगिकदंबप्र- तिबिंबकरंभितविमलविग्रहतया निश्चलसमाधियोगेनानिशं वपुषि कृ- तानुप्रवेशान् विगतपाशान् वामदेवादीन् सप्रत्यक्षविषयतयेव लक्षयंतं हाटकगिरिमिव ललिताहीनकटकं वासरपतिमिव सकृदारूढवृषभं दर्श दिवसमिव शीतदीधितिकलारूढं भिषजामिव हैमवतीलंभितकरं मूलो- द्यानं सकलविद्यालतानां कुलभवनं मंगलगुणानां चित्रकारं त्रैलोक्याले- ख्यचित्रीयस्य कर्णधारं संसारमहार्णवस्य मुक्ताफलं प्रणवशुक्तिकोशस्य लीलापारावतं उपनिषत्प्रासादस्य केलिकिलकंठं आगमविपिनोपकंठ- स्य विहारणपंचाननं पंचवर्णसौवर्णपंजरस्य परममांत्रिकं आश्रितज-

---

प्रमाणें सावळा रंग असलेल्या, अशा गौरीच्या स्तनप्रांतावरील रत्नांत मिसळलेल्या आपल्या प्रतिबिंबानें सरसपणें आलिंगनाच्या संभ्रमांत मग्न झालेल्या आत्म्याला प्रकट करितो कीं काय याप्रमाणें दिसणारा, व चोहोंकडे बसून नेहमीं सेवारूप शृंगारचेष्टा करण्यांत रसिक असलेल्या श्रेष्ठ योग्यांच्या समूहाचें प्रतिबिंब आपल्या शरीरांत पडल्यामुळें व दृढसमाधीच्या योगानें निज शरीरामध्यें (शिवपरवस्तू- मध्यें) शिरलेले, पाश तोडलेले अशा वामदेवादि मुनींला प्रत्यक्ष झाला आहे कीं काय ? याप्रमाणें दिसणारा, व चोख उत्तम सोन्याचे तट कंकणें असलेल्या मेरु- प्रमाणें कंकणें घातलेला (शिवाकडे सर्पांचीं कंकणें घातलेला असा अर्थ घ्यावा) सूर्या प्रमाणें वृषभारूढ झालेला, ( सूर्य वृषभारूढ ह्मणजे वृषभराशींत असलेला,) अमावास्येप्रमाणें चंद्रकलारूढ झालेला ( अमावास्येला चंद्राला कला एकच असते, त्या प्रमाणें इकडे शिवाकडे चंद्रकला धारण केलेला असा अर्थ घ्यावा) वैद्या- प्रमाणें हैमवतीचें पाणिग्रहण केलेला, (वैद्य लोक हिमालयावरील औषधें आण- तात, श्रीशिवानें हिमालयाची मुलगी आणिली असा अर्थ घ्यावा ) सर्व विद्यारूप वेलींला बागेप्रमाणें असलेला, मंगलगुणाला माहेरघर असलेला, त्रैलोक्यरूप चित्र रेखण्याला मोठा कुशल चितारी ह्मणवून घेणारा, संसाररूप महासमुद्राला तार- णारा कोळी ह्मणवून घेणारा, प्रणवरूप शिंपीमधील मोती ह्मणवून घेणारा, उप- निषत्रूप प्रासादावरचा पारवा ह्मणवून घेणारा, आगमरूप अरण्यांत क्रीडा कर- णारा कोकिल ह्मणवून घेणारा, पांच वर्णांच्या सोन्याच्या पंजरांतील सिंह ह्मणवून घेणारा, (पंचाक्षरस्वरूप पंचब्रह्म ह्मणविणारा असें तात्पर्य आहे.) आश्रित जना-

नाविद्यापिशाचिकोच्चाटनस्य कालजलधरं बोधकन्दलस्य मरुभुवं विषयवासनावाहिन्या निदानं नित्यताया बाह्यमनित्यताया अग्रभूमिमैश्वर्यातिशयस्य सर्वस्वं सर्वज्ञताया दूरतरं दुरंतकालचक्रभ्रमणसीमायाः पारे परितः प्रकाशमानं भक्तानुकंपया तत्तादृशवपुषं विश्वाधिकं महादेवमपश्यन् ॥ पद्यं ॥ छंदःसरोजवनविभ्रमराजहंसं चंद्रावतंसमजमप्रतिमं पुमांसम् ॥ दृष्ट्वा प्रणम्य मकुटाहतपादपीठं देवा विषर्तवपुर्षः परितुष्टुवुस्तम् ॥४३॥ नमः कालमहाचक्रनाडीभ्रमणहेतवे ॥ ब्रह्मांडकुंडिकाषंडकुंभकाराय शंभवे॥४४॥त्वदानंदलवाः शंभो शतानंदादयो वयम् ॥ निमिषार्धेन ते यांति परार्धशतकोटयः॥४५॥कालचक्रघटीयंत्रघटनैकपटीयसे ॥ स्वच्छंदपरमानंदस्रोतसे वेधसे नमः ॥४६॥ नादांतसौधदीपाय वेदांतोपवनालये ॥ द्वादशांतनभःसीतभानवे स्था-

---

च्या ठिकाणीं असलेलें अज्ञानरूप पिशाच घालविण्या विषयीं परमश्रेष्ठ मांत्रिक ह्मणवून घेणारा, बोधरूप केळीच्या बागेला समयानुसार वृष्टि पाडणारा मेघ ह्मणवून घेणारा, विषयवासनारूप नदीचा निर्जनप्रदेश ह्मणविणारा, नित्यतेला आदिकारण असलेला, अतिशय ऐश्वर्याची श्रेष्ठ भूमि ह्मणविणारा, कालचक्राच्या फेरीच्या परतीराच्या हद्दीपासून अतिशय दूर असलेला, अतिशय तेजस्वी असलेला भक्तांवर दया करण्याकरितां त्या त्या प्रमाणें शरीर धारण करणारा, जगांत श्रेष्ठ ह्मणवून घेणारा, अशा महादेवाला देवांनीं पाहिलें. वेदरूप कमलाच्या बागेंतील राजहंस ह्मणवून घेणारा, चंद्र धारण केलेला, जन्मरहित, परपुरुष, अशा श्रीशिवाला नमस्कार करून त्याच्या पीठावर आपापलें डोकें ठेवून विषाच्या बाधेनें घाबरून सगळ्या देवांनीं त्याचें स्तोत्र केलें. (४४) कालचक्राची नाडी फिरावयास कारण झालेल्या देवा, ब्रह्मांडरूप मडकीं तयार करणाऱ्या कुंभाराप्रमाणें असलेल्या देवा, भो शंभो, तुला नमन असो. (४५) तुझ्या आनंदांतील लव (अंश) प्रमाण आनंद भोगणारे आह्मी शतानंदादी देव होत. तुझ्या निमिषांच्या अर्ध्या वेळेंत परार्धशतकोट संख्येचे आमच्या सारखे देव उत्पन्न होतात, पुनः जातात. (४६) कालचक्ररूप रहाट तयार करण्यांत चतुर असलेला स्वच्छंदपणें परमानंदाचा प्रवाह ह्मणवून घेणाऱ्या देवा, तुला नमस्कार असो. (४७) वेदांतरूप उपवनांतील विलासमंदिरामध्यें असणाऱ्या, नादांत सौधदीपा, (नादांतरूप प्रासादावरचा दिवा ह्मणवून घेणारा) द्वादशदळांच्या हृदय कमलाला

णवे नमः ॥४७॥ क्रीडागृहीतवपुषे कृतरुंडमालाचूडालमौलिसुभगा-य सुखार्णवाय ॥ मायापटीघटितविश्वजगद्विचित्रचित्रावलीपरिकरा-य नमः शिवाय ॥४८॥ आनंदबोधवपुषे श्रुतिसुंदरीणां सीमंतमौक्तिक-गुणाय गुणार्णवाय ॥ कालांतकाय करुणामृतसागराय कात्यायनीप्रि-यतमाय नमः शिवाय ॥४९॥ विषमेक्षण पाहि नः प्रपन्नान् विषवेगप्र-सरेण दह्यमानान् ॥ शरणागतपालने विलंबं न हि कुर्वंति दयालवो महांतः ॥५०॥ देवा वयं केवलमिंदुमौले दरिद्रशक्तिप्रसराः प्रसिद्धाः ॥ अनंतशक्तिप्रसरानुबंधाद्भवान्महादेव इति प्रतीतः ॥५१॥ अस्माक मैश्वर्यलवे स्थितानां संकोचितानां भवतीश्वराख्या ॥ निजार्थ-पोषेण जगन्निदानं सर्वेश्वरं त्वामियमाह शंभो ॥५२॥ पतिस्त्वमेकः पशवो वयं हि पतित्वमैश्वर्यनिरंकुशत्वम् ॥ पशुत्वमेकं तदनीशतायाः

---

आनंद देणाऱ्या चंद्रा, स्थाणो, तुला नमन असो. (४८) लीलेकरितां शरीर धारण करणारा, किरीटावर रुंडमाळा घातल्यानें सुंदर दिसणाऱ्या देवा, सुखसमुद्रा, मायेच्या योगानें चित्रविचित्र जग निर्माण करणाऱ्या देवा, शिवा, तुला नमन असो. (४९) आनंदज्ञानस्वरूप शरीर असलेल्या देवा, वेदरूप सुंदर स्त्रियांच्या भांगांतील मोती ह्मणवून घेणाऱ्या देवा, गुणसमुद्रा, कालाच्या अंतका, करुणारूप अमृतानें परि-पूर्ण असलेल्या देवा, कात्यायनीच्या प्रियकरा ( पार्वतीपते ), शिवा, तुला नमन असो. (५०) हे विषमेक्षणा, विषाचा अतिशय वेग आमच्यानें सहन करवला नाहीं त्यामुळें जळालेल्या, व शरण आलेल्या आमचें रक्षण कर शरणागताचें रक्षण करण्याविषयीं दयाळुमोठेलोक कधींही उपेक्षा करीत नसतात. (५१) हे चंद्रशेखरा, आह्मी केवळ दरिद्रशक्तीचे (निर्बळ) आहोंत ह्मणून आह्मांला नुसते देव असें ह्मणतात, तूं केवळ अनंत शक्तीचा ह्मणून तुला सर्व लोक महा-देव असें ह्मणतात. (५२) ऐश्वर्याच्या कोणत्या तरी एका अंशांत असलेल्या व संकुचितपणें असलेल्या आह्मांला ईश्वर अशी पदवी नांवाला मात्र आहे. तोही अधिकार आपल्या स्वार्थाचें पोषण करितो ह्मणून आला आहे. परंतु तूं मात्र ज-गाचा प्रभु खरा आहेस त्या तुझ्याजवळ आह्मी शरण आलों आहोंत. (५३) पति तूं एकटाच असून आह्मी सर्व पशु आहोंत. पतित्व आणि प्रातिबंधरहित ऐश्वर्य तुझ्याठिकाणीं निरंतर आहे. अनीशपणामुळें पशुत्व आमच्या ठिकाणीं निरंतर आहे. हे शिवा, हा स्वस्वामिभावसंबंध आमच्या तुमच्या ठिकाणीं अनादि-

स्वस्वामिता नः शिव तेऽप्यनादिः ॥५३॥ स्वभूतानामिहास्माकं विल-
ये विषवन्हिना ॥ स्वतः स्वामित्वमुद्रा ते हीयते रुद्र सांप्रतम् ॥५४॥
गद्यम् ॥ इति विषवेदनया पुरुहूतादिष्वेवमाक्रोशत्सु दिविषत्सु समा-
सननिवासिनी दाक्षायणी दाक्षिण्यकलया पतिमेवमबोधयत् ॥पद्यम्॥
सीदंति देवा जलजासनाद्या विपद्यते विश्वकुटुंबमेतत् ॥ विषेण पाथो-
धिविजृंभितेन रक्षस्व रक्ष्यान् शिव विश्वमूर्ते ॥५५॥ सामिदग्धवपुषो
विषाग्निना त्वामनन्यशरणान् समाश्रितान् ॥ पाहि शंकर सुरान् म-
हीयसामार्तरक्षणकला हि भूषणम् ॥५६॥ इत्यंबा विश्वरक्षार्थे निर्वबंध
जगद्गुरुम् ॥ जनकादप्यपत्येषु जननी हि दयावती ॥५७॥ गद्यम् ॥ अथ
पशुपतिरंबावचनानुरोधादनुकंपया च निजया निखिलभुवनसंरक्षण-
दीक्षारंभयूपदंडमिव भुजदंडमेकमुध्दृत्य विषमुषितरोचिषां दिविषदां
परिषदमनुजग्राह जगदनुग्राहकः ॥ पद्यम् ॥ कारुण्यवाक्येन कपर्दि-

---

कालापासून चालत आलेला आहे. (५४) तुझी प्रजा आह्मी असून सांप्रत या विषाग्नीनें आह्मीं जळून गेलों ह्मणजे हे रुद्रा, तुझ्या ठिकाणीं असलेली प्रभुत्वमुद्रा लौकरच नाहींशी होईल. (प्रभुपणाचा अधिकार नाहींसा होईल.) (५५) याप्रमाणें विषाच्या वेदनेनें इंद्रादिदेव आक्रोश करीत असतां शिवाच्या अर्ध्या आसनावर बसलेली देवी पार्वती दाक्षिण्यामुळें (केवळ दयेमुळें) पतीला ह्मणाली, भो शंभो, ब्रह्मादिदेव सांप्रत समुद्रांत उत्पन्न झालेल्या विषानें दुःखी झाले आहेत. फार काय? सर्व जग संकटावस्थेमध्यें पडलें आहे. याकरितां विश्वमूर्ते, शिवा, रक्षणास योग्य अशा देवांचें रक्षण करा. (५६) या विषाग्नीनें यांसर्वांचीं निम्मीं शरीरें जळून गेलेलीं आहेत. ह्मणूनच तुझ्याशिवाय रक्षण करणारा दुसरा देव नाहीं हें जाणून तुह्मांला शरण आले आहेत. याकरितां हे शंकरा, यांचा सत्कार करून रक्षण करा. मोठ्या लोकांला भूषण ह्मणजे आतुर झालेल्या लोकांचें रक्षण करणें हेंच होय. (५७) याप्रमाणें मातोश्री पार्वतीनें जगद्गुरु शिवाला आपल्या वाक्पाशांनीं बांधून टाकिलें. तेंही खरेंच आहे. कारण मुलांवर जनकापेक्षां मातोश्रीचें अंतःकरण जास्त असतें ह्मणतात तें खोटें नव्हें. (५८) नंतर जगावर अनुग्रह करणाऱ्या श्रीपशुपतीनें देवी पार्वतीच्या वचनाला अनुसरून मोठ्या दयेनें सर्व जगाचें रक्षण करण्याविषयीं दीक्षेच्या वेळेस रोंवण्यांत येणाऱ्या यज्ञांतील खांबाप्रमाणें एक आपला हात उचलून विषानें मोहित झालेल्या देवांवर अनुग्रह केला. (अभयवचन दिलें.) त्या श्रीशिवाच्या करुणापर भाषणानें विषातुर झा-

नस्ते बभूवुराश्वासजुषो विषार्ताः ॥ कालांबुदस्य ध्वनिना रवेण ( र-थेण ) कलापिनो घर्मगुणादिवार्ताः ॥५८॥ आश्वास्य देवनिवहानभय-प्रदानादाकंपमानहृदयाननुकंपमानः ॥ काकोदरेंद्रकटकेन करेण ती-व्रं कालांतकोऽकवलयत्किल कालकूटम् ॥५९॥ कालकालमपहाय कः पुमान् कालकूटकवलीकृतौ कृती ॥ अंधकारहृदपास्य भास्करं हंत-कोऽस्ति दिविषत्सभांतरे ॥६०॥ पाणौ पतन् द्रुतमदृश्यत शूलपाणेः प्र-त्यग्रपल्लवरुचिप्रतिमल्लरागे ॥ कालांजनप्रतिभटो नवकालकूटः फुल्ला-रविंद इव पुष्पलिहां समूहः ॥६१॥ पाणिं गतः पशुपतेः कुचयोरुमायाः पत्रावलीं रचयितुं प्रणयाद्गृहीतः ॥ कस्तूरिकारस इव क्षणमावभासे कालांबुदद्युतिधरः किल कालकूटः ॥६२॥ ब्रह्माच्युतेंद्रप्रमुखैः सुरेंद्रैः प्रसह्य वेगं विषमंबुराशेः ॥ स पातुमैच्छत्सहसा पिनाकी सर्वोत्तरा-णां क भयप्रसंगः ॥६३॥ सपदि सुरकलत्रैः साश्रमाक्रोशमुक्तैर्विषपरव-शकांतैर्मंगलापायभीत्या ॥ पशुपतिमनुमेने पातुमुग्रं विषाग्निं मनसि

---

लेल्या देवांना समाधान वाटलें उन्हाळ्यानें आतुर झालेल्या मोरांवर पाऊस पड-ल्यावरोबर त्यांना जसा संतोष व्हावा, तसा संतोष देवांना झाला. (५९) विषा-च्या भीतीनें छाती धडधड करीत असलेल्या देवांवर कृपा करून अभय वचन देऊन आश्वासन देऊन शेषाचें कंकण हातांत घातलेल्या महादेवानें तें कालकूट एका क्षणांत पिऊन टाकिलें. (६०)काळाचा काळ अशा महादेवाशिवाय काळ-कूटविष पिण्यास कोण समर्थ होईल बरें ? अंधार घालविणाऱ्या सूर्याखेरीज देव-सभेंत कोण अंधार दूर करणार आहे ? (६१) कोंवळ्या पानाच्या कांतीप्रमाणें कांति असलेल्या शिवाच्या हातांत काजळाप्रमाणें असलेलें तें कालकूटविष फुल-लेल्या कमलामध्यें भ्रमर जसे दिसावेत, त्याप्रमाणें दिसलें. (६२) पशुपतीच्या हातांतलें काळमेघाप्रमाणें असलेलें तें विष पार्वतीच्या स्तनावर चित्र रेखाटण्या-करितां घेतलेल्या कस्तुरीच्या रसाप्रमाणें एक क्षणपर्यंत भासलें. (६३) समुद्रांत उद्भवलेलें तें विष ब्रह्मा, विष्णु, वगैरे देवांनाही असह्य झालें होतें. तसलें भयंकर विष पिण्याकरितां श्रीशिवांनीं धाडस केलें. यावरून सर्वांपेक्षां श्रेष्ठ अशा महा-त्म्यांना भीतीचा प्रसंग कोठून येईल बरें ? (६४) विषाच्या ताब्यांत आपले नवरे पूर्णपणें सांपडल्यामुळें देवांगना सर्व अमंगळाच्या शंकेनें आक्रोश करूं लागल्या होत्या, त्यामुळें श्रीपार्वती मातोश्रीनें विषपान करावयास आपल्या पतीस अनुमति दिली, परंतु विषाग्नि भयंकर वाटल्यावरून आपल्या मनांत पतीचें कल्याण चिं-

निजमभंगं मंगलं चिंतयंती ॥६४॥ स्वादुनः करसरोजवर्तिनः कालकूटमधुनोऽस्य साधवः (ह्युमाधवः)॥ सादरः सुमनसां समुच्चये शंकरः स्वयमवाप भृंगताम् ॥६५॥ कात्यायनीकनकपंकजसोदरेण कल्याणकंकणवता सहसा करेण॥कंठे गतं तदरुणद्गरलं पुरारेरंतर्गतस्य भुवनस्य विपत्तिभीत्या ॥६६॥ कज्जलद्युतिमुषा विषाभया कंठनाळगतया स शंकरः ॥ नीलकंठ इति नाम लब्धवान् निर्विषीकरणमंत्रदेवता ॥६७॥ कालांतकाख्यगलसीमनि कालकूटे व्यातन्वति स्थितिविभूषणबद्धशोभाम् ॥ मांगल्यसूत्रमभवन्मरुदंगनानां कंठेषु गाढसहनं क्षणमात्र एव ॥६८॥ पीत्वा विषं पयोराशेर्जगज्जीवनसिद्धये ॥ घनाघन इवेशस्य कंठोऽभूत्कालिमास्पदम् ॥६९॥ कंठसीम्नि गरलेन शूलिनः कालिमाश्रयति नाकवासिनाम् ॥ आननं विगतकालिमाभवद्राहुमुक्तमिव चंद्रमंडलम् ॥७०॥ कटाक्षो हरिणाक्षीणां कालकूटश्च तत्समौ ॥

---

तीत ती स्वस्थ बसली. (६५) करकमलांत असलेल्या कालकूटरूप गोड मधाला श्रीशंकर आदरपूर्वक सर्व देवांसमक्ष स्वतः भ्रमर झाले. (भ्रमर जसे फुलांतला गोड रस पितात, त्याप्रमाणें कालकूट गोड करून विन आयासानें श्रीशिवांनीं पिऊन टाकिलें असें तात्पर्य आहे.) (६६) सोन्याप्रमाणें पिंवळे असलेल्या कमळाप्रमाणें शोभणाऱ्या आपल्या हातानें श्रीपार्वती मातोश्रीनें श्रीशिवाच्या गळ्यापर्यंत गेलेल्या विषाला तेथेंच दावून टाकिलें. याचें कारण असें कीं तें विष पोटांत गेलें असतें तर पोटांत असलेल्या जंगाला अपाय होईल ही भीति होती. (६७) परंतु काजळापेक्षां काळें असलेलें तें विष श्रीशिवाच्या गळ्यांतच अडकून राहिल्यामुळें गळा काळा झाला, म्हणूनच विषाचा विषपणा नाहींसा करणाऱ्या त्या श्रेष्ठ देवतेला नीलकंठ असें नांव मिळालें. (६८) कालांतक श्रीशिवाच्या गळ्यांत कालकूट व्याप्त होऊन तेथेंच राहून एखाद्या दागिन्याप्रमाणें जेव्हां शोभावयास लागलें, तेव्हां देवांगनांच्या गळ्यांतील मंगलसूत्राला आपल्या स्थितीविषयीं एका क्षणांत निश्चयाचा भरंसा वाटला. (६९) सर्व जग वांचविण्याकरितां समुद्रांतल्या विषाला प्याल्याबरोबर श्रीशिवाचा गळा काळ्याकुट्ट मेघाप्रमाणें काळा झाला. (७०) श्रीशिवाच्या गळ्यांत राहून विषानें आपला काळेपणा व्यक्त केल्याबरोबर सर्व देवांचीं तोंडें विषाच्या भीतीनें आलेल्या कालिमेपासून मुक्त होऊन राहूपासून सुटलेल्या चंद्रमंडलाप्रमाणें सतेज दिसूं लागलीं. (७१) हरिणाप्रमाणें विशाल डोळे असणाऱ्या स्त्रियांचा कटाक्ष आणि हें कालकूट दोनी स्वभावानें सारखींच आहेत.

एकं कामजितं हित्वा यदलं विश्वमोहने ॥७१॥ पूज्यः स एको जितपुष्पबाणो यः कालकूटादविकारिचेताः ॥ मरुद्गणे मानुषमंगलेव कटाक्षपातात्कमलेक्षणानाम् ॥७२॥ गद्यम् ॥ ततः सपदि विगतभीतयो विबुधा विविधोपनिषदुपवननीलकंठं नीलकंठमस्तुवन् ॥ वास्तवैरुदाहरणैः ॥ श्लो० ॥ विषसागरनिर्मग्नविश्वोत्तारणहेतवे ॥ ॐ नमो नीलकंठाय रुचिरांगकलापिने ॥७३॥ क्व गता कालकूटस्य शक्तिस्त्रैलोक्यमोहिनी ॥ नीलकंठस्य ते शंभो महिमा तव कीदृशः ॥७४॥ निर्धूलिहूतमखिलं जगदंतकाले निर्लेढि फालनयनांकुरितोऽग्निपातः ॥ तं त्वां विना जगति मोहितसर्वभूतं कः कालकूटमिह कंठगतं करोति ॥७५॥ पशवो वयमंबुजासनाद्याः पतिरेकस्त्वमुमापतिः स्वतंत्रः ॥ विपदो यदि रक्षसेऽद्य नास्मान् पतिभावस्तव केन हेतुना स्यात् ॥७६॥ ब्रह्मविष्णुबलशासनादिभिर्दुःसहं कृतवता विषं त्वया ॥ रक्षितं हि सकलं चरा-

---

कारण विषानें कामजेत्याला (शिवाला) सोडून जगाला मोहित केलें, आणि कटाक्षही एका कामजेत्याला (विषय सोडलेल्या पुरुषाला) सोडून सगळ्या जगाला मोहित करावयास समर्थ आहे. (७२) कालकूट विष पिऊनदेखील त्या कामारीच्या (शिवाच्या) मनांत विकार उत्पन्न झाले नाहींत, त्या अर्थी सर्व देवांमध्यें साक्षात् शिवच पूज्य होय. त्याप्रमाणें मानवांमध्यें स्त्रियांच्या कटाक्षाला जो बळी पडत नाहीं तो एकच जगांत पूज्य होतो. (७३) नंतर तात्काळ सर्वांची भीति नाहींशी झाल्यामुळें सर्व देव उपनिषद्रूप बागेंतल्या मोराप्रमाणें शोभणाऱ्या (उपनिषत्प्रतिपाद्य) त्या नीलकंठाची स्तुति वास्तविक उदाहरणांनीं करूं लागले. विषरूप समुद्रांत बुडालेल्या जगाला तारण्यास कारण झालेल्या देवा, नीलकंठा, सुंदरांगा, तुला नमन असो. (७४) भो शंभो, त्रैलोक्याला मोहित करणारी ती कालकूटाची शक्ति तुझ्यापुढें कोठें गेली. श्रीशंकरा, तुझा महिमा अपार आहे, यांत शंका नाहीं आणि तो प्रभाव कसा आहे, कळत नाहीं. (७५) श्रीशंकरा, तुझ्या कपाळांवरील नेत्रांतून अग्नीच्या ठिणग्या पडूं लागल्या म्हणजे प्रळय कालांत सगळें जग नाहींसें होतें. याप्रमाणें सर्व जगाला मोहित करणाऱ्या तुझ्याशिवाय कालकूट विष पिणारा जगांत कोण समर्थ आहे? (७६) ब्रह्मादि सर्व देव आम्ही पशु असून या सर्वांचा पति उमापति तूं एकटाच स्वतंत्र आहेस. अशा विपत्तींतून आम्हांला काढिलें नसतें तर तुझ्याठिकाणीं पतिपणा कसा कायम राहिला असता? (७७) ब्रह्मा, विष्णु, इंद्र यांना असह्य झालेलें विष तूं सहज

चरं त्वां विनेश जगतोऽस्ति कः पतिः ॥७७॥ अष्टमूर्तें जगन्मूर्तें जगदे-
तच्चराचरम् ॥ त्वया संरक्षितं विश्वं त्वद्देहः किल रक्ष्यते ॥७८॥ अभि-
रक्षितुमापदः पदे यानपराधे सति शासितुं प्रवीणः ॥ ससुरासुरमा-
नुषं प्रपंचं तदसि त्वं शिव सर्वलोकनाथः ॥७९॥ चंद्रचूड तव पाद-
पीडनक्रीडया सपदि कीटसन्निभः ॥ अंतमाप जगदंतकः प्रभो किं त-
वास्ति गिरिशास्ति भीतये ॥८०॥ इति स्तुत्वा महादेवमिंद्रोपेंद्रादयः
सुराः ॥ तस्या धूसरयन् पादौ मौलिमंदारधूलिभिः ॥८१॥ आस्वाद्य
हालाहलमादिवैद्यः कृत्वापभीकान् कृपया सुरेंद्रान् ॥ आदिश्य भूयोऽ-
मृतजन्ममूलं मूलौषधीस्ता व्यसृजत्समोदात् ॥८२॥ निर्दिष्टाः परमे-
श्वरेण बहुशो निक्षिप्य दिव्यौषधीः प्राचीनक्रमतो विमथ्य विबुधाः
सिंधुं मुकुंदादयः ॥ लक्ष्मीकौस्तुभपारिजातमदिराचंद्रादिनानाफलैर्ल-
ब्ध्वा चामृतमीहितात्तिमुदिताः स्वस्वाधिकारं ययुः॥८३॥

इति श्रीकविवादिशेखरकृतौ शिवचरिते द्वितीयोऽच्छ्वासः॥

---

पिऊन टाकिलेंस, त्यामुळें सर्व जग जीवंत राहिलें. तर तुझ्या शिवाय जगाचा प्रभु दुसरा कोण असणार? (७८) अष्टमूर्तें, जगन्मूर्तें, हें चराचर जग तुझ्यामुळें वांचलें. अर्थात तूं विश्वरूप असल्यामुळें तुझें शरीरच पोसल्याप्रमाणें झालें. (७९) संकटांत पडलेल्या लोकांना संरक्षण करणारा तूंच आहेस, आणि अपराधी लोकांना शासन करणाराही तूंच आहेस, देव, दानव, मनुष्यमय या जगाचा प्रभु तूंच असल्यामुळें हे शिवा, तुला लोकनाथ ह्मणतात. (८०) हे चंद्रचूडा, तुझ्या पायाच्या सहज लाथेसरशी जगाचा अंत करणारा यम तात्काळ बेशुद्ध होऊन पडला, तो तुला यःकश्चित किड्यासारखा वाटला. तर हे गिरीशा त्यातुला भीति कोठून येईल बरें? (८१) याप्रमाणें इंद्र उपेंद्र वगैरे देवांनीं महादेवाची स्तुति करून आपल्या किरीटावरील मंदारपुष्पांच्या परागानें श्रीशिवाचे पाय धुळकट करून टाकिले. (८२) आदिवैद्य श्रीशिवानें हालाहल विष पिऊन सर्व देवांची भीति नाहींशी करून सर्व जगाला अमृतमय करून (वांचवून) पुनः आनंदानें सर्व औषधी उत्पन्न केल्या, (८३) याप्रमाणें श्रीशिवाची आज्ञा घेऊन सर्व दिव्य दिव्य औषधि टाकून पुनः पूर्वीप्रमाणें मुकुंद वगैरे सर्व देवांनीं समुद्र मंथन केलें. त्यामुळें पुढें लक्ष्मी, पारिजात, कौस्तुभ, मदिरा, चंद्र वगैरे रत्नें त्यांना मिळूनें पुढें अमृतही मिळून सर्व देवांना पूर्वीचा आपापला अधिकार मिळाला.

याप्रमाणें श्रीकविवादिशेखरकृतींतील शिवचरितांतील दुसरा उच्छ्वास संपला.

# अथ तृतीयोऽच्छ्वासः

श्रीशिवाय नमः ॥ पुरा खलु पुरातनस्त्रिभुवनशिल्पिकारः कल्पादौ कलितकतिपयभूतकलासृष्टिः परमेष्ठिर्मिथुनजामेव प्रजासृष्टिमभिलक्ष्य निजवपुषोऽर्धेन प्रथमं महानुभावं मनुमसृजत् ॥ ततोऽर्धेन चतुरूपां ( शतरूपाम् ) नाम कन्यकां अजीजनत् ॥ साऽपि तपसा तमेव भर्तारं स्वायंभुवं मनुमुपागता ॥ सरस्वतीसरसिजभवयोरिव तयोः परस्परं बभूव समरसः प्रणयनिष्यंदः ॥ सा तस्मादलभत सुलभव्रत-प्रियव्रतोत्तानपादाविति तनयौ नयनसंपन्नविनयौ प्रसूतिराकूतिरिति ततः प्रासूत कन्यकारत्नद्वयम् ॥ स मनुरनुरूपलक्ष्म्याकृतिमाकूतिमितरारुचये रुचये प्रादात् ॥ परार्ध्यं प्रसूतिं प्रसूतिमपि तां मुनिजनाध्यक्षाय दक्षाय प्रायच्छत् ॥ तत्रांतरे चतुराननतपःप्रसन्नेन समादिष्टा शंकरेण परा शक्तिरंबिका भगवती तदविनाभूताऽपि स्वांशकरणयित-या विविधयुवतिसर्गनिर्गमनेन मिथुनसृष्टिसंभवाय विश्वस्य विशद-शुभलक्षणायां दक्षदयितायां प्रसूतौ प्रसूतिं प्रथमतः स्वेच्छया प्राप्त-

---

श्रीशिवास नमस्कार असो. पूर्वी त्रैलोक्याचें चित्र रेखणारा पुरातन चितारी अशा ब्रह्मदेवानें कल्पाच्या आरंभीं कांहीं प्राण्यांची सृष्टि करून पुढें स्त्रीपुरुषां-पासून सृष्टि वाढवावी ह्मणून मनांत विचार करून आपल्या अर्ध्या शरीरापासून प्रथम महानुभाव अशा मनूला निर्माण केलें. नंतर दुसऱ्या अर्ध्या शरीरापासून सुंदर शतरूपा नांवाच्या कन्येला निर्माण केलें. पुढें त्या शतरूपेनें मोठें तप करून स्वायंभुवमनूला पति करून घेतला. सरस्वती ब्रह्मदेवाप्रमाणें त्या दंपतीमध्यें परस्पर स्नेहसंबंध वाढला. पुढें त्या दोघांच्या पोटीं सुलभपणें व्रत करणारे प्रियव्रत उत्तानपाद असे दोन मुलगे झाले. हे दोघे नीतीमध्यें अतिशय उत्तम होते. नंतर प्रसूति, आकूति दोन मुली झाल्या. नंतर मनूनें साक्षात लक्ष्मीप्रमाणें सुंदर असलेल्या आकूति नांवाच्या मुलीला रुचि नांवाच्या ऋषीला देऊन लग्न करून टाकिलें. दुसऱ्या त्या प्रसूतीला मुनिजनांमध्यें श्रेष्ठ असलेल्या दक्षप्रजापतीला दिलें. ही प्रसूति मुख्यसंततीची होती. इतक्यांत ब्रह्मदेवाच्या तपश्चर्येला प्रसन्न झालेल्या श्रीशंकराच्या आज्ञेनें श्रेष्ठ परशक्ति अंबिकेनें आपण स्वतः श्रीशंकरापासून केव्हांही वियोग पावत नसूनही आपल्या कांहीं अंशानें अनेक तऱ्हेच्या युवतींची ( तरुणींची ) सृष्टि कशी व्हावी त्याप्रमाणें द्वंद्वसृष्टि वाढविण्याकरितां विश्वास देऊन चांगल्या निर्मळ लक्षणाच्या दक्षभार्या प्रसूतीच्या पोटीं पहिली मुलगी व्हावी अं-

वती ॥ पद्यम् ॥ यामामनंति परमां हि शिवस्य शक्तिं यस्या विभूति-शकले सकलः प्रपंचः ॥ सर्गस्य पोषविधये तरुणीमयस्य दक्षस्य सा समभवत्तनया सतीति ॥१॥ तां सर्वमंगलमयीं तरुणेंदुमौलेः कांताम-सह्यविरहां कमलासनोक्त्या ॥ विज्ञाय साधु स पुनर्विततार तस्मै कं कौमुदीकुमुदवंधुमपास्य याति ॥२॥ तस्यैव शक्तिकलयेव मनःप्रसूता संजज्ञिरे सकलतापसवंशमूलम् ॥ रम्याकृतीनि सकलप्रियदर्शनानि कन्यामयानि कतिचित्कुलभूषणानि ॥३॥ कन्याः प्रजापतिरदात्कमनी-यरूपा धर्माय काश्चिदपराः शशभूषणाय ॥ भृग्वादये च कतिचित्पृ-थुभाग्यलक्ष्मीमेकां पितृभ्य इतरामपि पावकाय ॥४॥ सौशील्यसंपद-नुरंजितभर्तृकाणां तासां वभूवुरथ संततयः सहस्रम् ॥ ताभिः प्रपंच-परिपूर्तिमवेक्ष्य धाता संतोषमाप तनुसर्गकलाप्रयासः ॥५॥ गद्यम् ॥ तदा खलु दक्षप्रजापतिरपि वीक्ष्य विविधसंततीनां निजनंदिनीनां वि-

---

मनांत आणून ती पहिली मुलगी होऊन जगांत स्वेच्छेनें आली.(१)जिला शिवा-ची श्रेष्ठ परमशक्ति असें ह्मणतात, जिच्या विभूतीच्या किंचित एका तुकड्यामध्यें सर्व जग राहिलें आहे, अशी ती माया तरुणस्त्रियांच्या सृष्टीची वाढ होण्याकरितां दक्षाच्या पोटीं मुलगी होऊन सती ह्मणून प्रसिद्धीस आली. (२) सर्व मंगलस्वरूप, अशी ती सती चंद्रशेखराचा विरह सहन न होऊन कृश होत गेली. तेव्हां ब्रह्म-देवाच्या आज्ञेनें श्रीदक्षप्रजापतीनें आपल्या मुलीला श्रीशिवास देऊन लग्न केलें. हें वरोवरच झालें. कारण चंद्रिका चंद्राला सोडून कधीं राहिली आहे काय? (३) पुढें त्याच दक्षप्रजापतीच्या शक्तीच्या योगानें सर्व तापस्यांच्या वंशाचें मूल अशा पुष्कळ कन्या झाल्या. त्या सर्व सुंदर आकृतीच्या असून पाहणारांच्या डोळ्यांला आनंद देणाऱ्या होत्या. तेव्हां कन्या पुष्कळ होणें हें कुळाला भूषण आहे असें कांहीं लोक ह्मणूं लागले. (४) त्यांपैकीं कांहीं सुंदर सुंदर कन्या यमधर्माला दि-ल्या व कांहीं कन्या चंद्राला दिल्या, भृगु वगैरे ऋषींला कांहीं कन्या दिल्या, मोठी भाग्यलक्ष्मी अशा एक कन्येला पितरांना दिलें. दुसऱ्या एका कन्येला अग्नीला देऊन लग्न केलें. (५) या सर्व कन्या आपल्या सुशीलपणानें आपापल्या नवऱ्यांना आनंद देऊं लागल्या. पुढें यांच्या पोटीं हजारों मुलें झालीं. याप्रमाणें त्यांची त्यांची संतति वाढलेली पाहून ब्रह्मदेवाला आपल्या शरीरापासून सृष्टि केल्यावद्दल मोठा संतोष वाटला. (६) तेव्हां दक्षप्रजापतीनें आपल्या मुलींच्या पोटीं संतति वाढलेली पाहून आपल्या मनांत मोठाच आनंद मानला. याप्रमाणें

भूतिकंदलं बभूव परमानंदपरिवाहितमनाः ॥ स कदाचिद्धन्यानामा-त्मकन्यानां तानि तानि सदनान्युपसृत्य संततिभिः सभर्तृकाभिः ता-भिरनुमोदितः संभावितः सन् गरकंठसहचारिणीमपि निजकन्यामव-लोकयितुं महितोत्कंठस्तदावासमसकृदभिजातकंठकिन्नरमिथुनकृतम-धुरगीतविलासं कैलासमयासीत् ॥ तत्रांतरे प्रबोधलाभाय पशुपति-मुपस्थातुं परमर्षयोऽपि प्रपेदिरे ॥ पद्यम् ॥ तत्त्वदर्शिभिरदर्शि तापसै-स्तत्र तत्र परितो महेश्वरः ॥ अंबया सह समानुकंपया नित्यमंगलगु-णैर्गणैर्वृतः ॥६॥ चतुर्भुजं चंद्रकलावतंसं त्रिलोचनं दीप्तजटाकलापम्॥ उमासखं लोचनभागधेयं दृष्ट्वा तमासन्मुनयोऽतिहृष्टाः ॥७॥ ते प्रणम्य महादेवं जटाचुंबितभूमयः ॥ तुष्टुवुः स्पष्टरोमांचाः श्रुतिसीमंतमौक्ति-कम् ॥८॥ ॐकारपंकेरुहकेलिभृंगमुद्भेदकंदं जगतीलतायाः ॥ त्रय्यंत-सौधस्थलरत्नदीपं शंभो भवंतं शरणं व्रजामः ॥९॥ भूरुध्दता येन प-

---

संसारांत आपणांस धन्य मानून घेतलेल्या त्या मुलींच्या घरीं जाऊन यावें असा विचार करून त्या त्या घरीं जाऊन आपल्या नातवांकडून, मुलींकडून, जांवयां-कडून सत्कार घेत नीलकंठाची सहचारिणी सती जी आपली मुलगी होती, ति-च्या घरींही जाऊन तिला पाहावें अशा उत्कंठेनें तिच्या घरीं मोठ्या कौतुकानें तो दक्षप्रजापति आला. अशा त्या कैलासामध्यें नेहमीं किन्नरलोक मोठ्या आनं-दानें विलास करीत होते ते दृष्टीस पडले. इतक्यांत ज्ञानलाभ करून घेण्याकरितां मोठमोठे ऋषीही आले होते. तत्ववेत्ते अशा त्या महामुनींनीं त्या कैलासामध्यें जिकडे तिकडे चोहोंकडे महेश्वराला पाहिलें त्या त्या ठिकाणीं श्रीमहेश्वर आपल्या कल्याणकर गुणांनीं युक्त होऊन अंबिकेसह बसले होते. (७) त्या महेश्वराला चार हात असून डोक्यावर चंद्र सुशोभित होऊन दिसत होता, त्याला डोळे तीन असून शिरोभागावर तांबड्या जटा चमकत होत्या त्याच्या जवळच उमा बसले-ली असून मोठी सुंदर होती, अशा त्या शिवाला पाहून सर्व मुनि मोठ्या आनं-दानें आपल्या नेत्रांची सार्थकता झाली असें ह्मणूं लागले. (८) त्या सर्व मुनींनीं तेव्हां आपलें शिर जमिनीपर्यंत लववून आंगावर रोमांचांनीं युक्त होऊन वेदाच्या अग्रभागीं राहणाऱ्या त्या शिवाची स्तुति केली. (९) ॐकाररूप कमलांतील भृंग (भुंगा) ह्मणविणाऱ्या देवा, जगरूप लतेच्या (वेलीच्या) कंदा (उत्पत्ति-कारणा,) वेदांतरूप महालावरील रत्नदीपा, हे शंभो, तुला आह्मी शरण आलों आहोंत. (१०) प्रलयसमुद्राच्या लाटांच्या मधून वराहमूर्ति परपुरुषानें पृथ्वीचा

रेण पुंसा वराहमूर्त्या प्रलयोर्मिमध्यात् ॥ अद्यापि यं द्रष्टुमभूत्सनालं तत्ते पदं शंकर दृश्यते नः ॥१०॥ भुवः समुद्रावधि नायकत्वं पुरंदरश्रीर्भुवनेशिता वा ॥ सिध्यंति तेषां सकृदर्पितं यैः प्रसूनमेकं भवतः पदाब्जे ॥११॥ स्वाराज्यलक्ष्मीर्द्रुहिणाधिपत्यं परस्य पुंसः परमं पदं वा ॥ विश्रांतिभूमिः किल चंद्रमौले सर्वोत्तरं तद्भजतां पदं ते ॥१२॥ महस्त्वदीयं परमं महेश मनःपदव्या वचसां च दूरे ॥ तेजांसि भूयांसि यदंशलेशात्तिग्मांसुशीतांशुपुरःसराणि ॥१३॥ जनः स पूतः सुकृती स पूज्यो जगत्त्रयस्याप्यधिदेवता सः ॥ मृत्योः स दूरे स विधेर्विधाता सुधांशुमौले त्वयि भक्तिमान् यः ॥१४॥ तपश्चरंतः शतकोटिकल्पं तपस्विनो यातुमनीश्वरा याम् ॥ अक्लेशमीश त्वयि भक्तिलेशं कृत्वा श्रियं तां कृतिनो लभंते ॥१५॥ सत्यं चिदानंदमयं परं ते रूपं प्रपंचात्मकमन्यदेतत् ॥ त्रिलोचनं देव वपुस्तवेदं प्रपत्तिभाजां परिपाल-

---

उद्धार केला, त्या वराहाला जो तूं दिसला नाहींस तो तूं आज आह्मांला दिसलास. (११) भो शंभो, तुझ्या पदकमलावर एक फूल भक्तीनें वाहिलें तर समुद्रांतपृथ्वीचें सार्वभौमपद मिळतें किंवा स्वर्गलोकाची संपत्ति मिळते. याप्रमाणें तुझ्या आराधनेचें फळ आहे. (१२) भक्तीनें तुझें भजन करणाऱ्या पुरुषांना स्वराज्यसंपत्ति मिळते, व इच्छा केल्यास ब्रह्मदेवाचें पद मिळतें, किंवा त्याहून जास्त इच्छा केल्यास साक्षात् परपुरुषाचें श्रेष्ठ पद मिळतें, भो चंद्रशेखरा, फार काय! तुझ्या भक्तांना तुझी विश्रांतीची भूमि सर्वांपेक्षां श्रेष्ठ असें प्रत्यक्ष कैलासपद देखील मिळतें. (१३) हे महेशा, तुझें श्रेष्ठ तेज मन आणि वाणी यांच्या मार्गापलीकडे अतिशय दूर आहे. सूर्य चंद्र व अग्नि वगैरे तेजस्वी वस्तु तुझ्या तेजाच्या एका अंशापासून उत्पन्न झाल्या आहेत. (१४) हे चंद्रमौले परमेश्वरा, तुझ्या ठिकाणीं जो प्राणी भक्ति करितो, तो मनुष्य पुण्यवान् असून धन्य होय. व तो सर्वांकडून पूज्य असून तीन्ही लोकांचें मुख्य दैवत ह्मटलें तरी चालेल अशा त्या भक्ताजवळ मृत्यु कधींही येत नाहीं. फार काय? परंतु त्या ब्रह्मदेवाचा उत्पन्नकर्ता देखील तो होतो. (१५) शेंकडो कोट्यावधि कल्पपर्यंत तप करून तपस्वी लोकांना जी संपत्ति मिळण्यास अशक्य असते, ती संपत्ति तुझ्या ठिकाणीं थोडी भक्ति केल्याबरोबर त्या चतुर लोकांना तात्काळ मिळते. (१६) हे परमेश्वरा, तुझें रूप सत्यस्वरूप व चिदानंदमय असून परम श्रेष्ठ आहे. हें तुझें रूप काय दिसतें हें प्रपंचमय आहे. तीन डोळे, चार हात वगैरे अवयव असलेलें हें

नाय ॥१६॥ इति स्तुतिं भक्तिमतां मुनीनां निशम्य देवो नितरां प्रसन्नः ॥ कृपावलोकेन स केवलेन कृतार्थयामास विबोधयंस्तान् ॥१७॥ ते लब्धबोधाः शिवदर्शनेन सिद्धाश्रमानापुरतिप्रमोदाः ॥ कारुण्यवंतो महतां कटाक्षा वंध्या भवेयुः कथमाश्रितेषु॥१८॥ दक्षो विचारदक्षोऽथ दैवगत्या दुरंतया ॥ न ननाम न तुष्टाव जामातेति जगद्गुरुम् ॥१९॥ भावहीनः स नो लेभे प्रबोधं शिवदर्शनात् ॥ कुतो विकासमायाति कुमुदं तपनोदयात् ॥२०॥ ततो दक्षः सक्षोभं मनस्येवमचिंतयत् अहो तामसैश्वर्यस्य सहजोद्धतिः सतामाचारपद्धतिमतिक्रमत् ॥ यदयं ज्ञानदुर्विदग्धो धूर्तशेखरो धूर्जटिः श्वशुरतया गुरुं मां चिरकालदृढमभ्युपगतमभ्युत्थाय नानंसीत् ॥ न वाचाप्युपचचार न चासनादिभिरपि केवलं भेताल इव मुनिजनांतरसमं समालोकयत् ॥ किमिदमाश्च-

---

तुझें रूप तुझ्या ज्ञानी भक्तांच्या संरक्षणासाठींच आहे. (१७) भक्तिशाली मुनींनीं केलेली ही स्तुति ऐकून श्रीशिव त्यांना प्रसन्न झाले. नंतर त्यांच्यावर नुसता कृपाकटाक्ष टाकून त्या सर्व ऋषींना परमज्ञान देऊन श्रीशिवांनीं कृतार्थ केलें. (१८) श्रीशिवाचें दर्शन झाल्याबरोबर सर्वांना अत्युत्तम ज्ञान झालें. याप्रमाणें ते ऋषि कृतार्थ होऊन अतिशय आनंदानें सिद्धाश्रमाला परत आले. मोठमोठ्यांचे कृपाकटाक्ष अतिशय करुणाशील असल्यामुळें आश्रय केलेल्या लोकांचे ठिकाणीं ते निष्फळ कसे होतील बरें ? (१९) असो इकडे जावयाच्या दर्शनाकरितां म्हणून गेलेला दक्षप्रजापति हा स्वतः मोठा विचारसंपन्न असूनही दैवगति ओढवल्यामुळें जगद्गुरु श्रीशिवास जावई अशा समजुतीनें त्यानें नमस्कार केला नाहीं, व स्तोत्र केलें नाहीं. (२०) त्या दक्षाला शिवदर्शन झालें तरी श्रीशिवाच्या ठिकाणीं भाव नसल्यामुळें ज्ञान प्राप्त झालें नाहीं. सूर्योदय जरी झाला तथापि कुमुदें (चंद्रविकासी कमलें) कधीं फुलतील काय ? (२१) नंतर मोठ्या संतापानें दक्षानें आपल्या मनांत विचार केला कीं,—अहो काय आश्चर्य आहे पहा ! तामससंपत्तीच्या लोकांचा साहजिक उद्धटपणा सज्जनांची पद्धत झुगारून द्यावयास कांहीं कमी करीत नाहीं. ज्याअर्थीं या अज्ञानी उन्मत्त धूर्जटीनें (शिवानें) मी स्वतः याचा गुरु (वडील) असून सासरा असून व पुष्कळ दिवसांनीं भेट घेण्याकरितां आलेला असून उठून मला नमस्कार देखील केला नाहीं. फार काय ! नुसत्या तोंडानें उपचाराच्या दोन गोष्टी देखील केल्या नाहींत. मी याच्या घरीं आलेला असून मला आसन वगैरे दिलें नाहीं. एखाद्या पिशाचाप्रमाणें सर्व इतर

र्यं सुतापि तावदियमस्य साहचर्यादीदृशी संवृत्ता मुनीनामहो मोहः किमस्य स्तुतिमावहन् किमस्मादलमालापैः किमिह मे स्थित्या आमनंति हि नीतिविदः ॥ पद्यम् ॥ त्याज्यः स देशो विद्वद्भिः सर्वसंपत्तिमानपि ॥ वर्तते यत्र दुर्वारः पूज्यपूजाव्यतिक्रमः ॥२१॥ इति संचिंत्य दुर्मानमानसः स्वाश्रममयासीत् ॥ अथ दुर्मानधूपितमुखरुचिरूक्षः स दक्षः स्वाश्रमे विश्रांतः स्वभार्यया प्रसूत्या तावदेवं पृष्टोऽभूत् ॥ स्वामिन् किमगमि दुहितृपतिनिवासः कैलासः किमदर्शि शुभदर्शनः सह दुहित्रा जामाता शंकरः कथमिव भवतां मुखरुचिरसमीचीनं किमपि मनोगतमातंककलंकं पिशुनयति इति पृष्टः क्लिष्टमनाः स मुनिरेवं मानिनीं स्वगेहिनीमवादीत्॥अये किमन्यदस्ति कन्यालाभक्लेशादातंककारणम् धन्यानामपि कन्याबाहुल्यलुलिताद्गार्हस्थ्यात्सन्न्यास

---

ऋषींप्रमाणें मलाही यानें केलें काय आश्चर्य आहे पहा ? माझी पोटची मुलगी असून या दुष्टाच्या सहवासानें तिनेंही माझा सत्कार केला नाहीं ही अशी कशी झाली ? काय या ऋषींचा मोह तरी पहा ? असो. याच्याशीं भाषण करून काय उपयोग आहे ? येथें राहणेंही चांगलें नव्हे. नीति जाणणारे लोक सांगतात कीं, ज्या ठिकाणीं गेलें असतां आपला आदरसत्कार होत नाहीं तें ठिकाण मोठ्या संपत्तीचें असलें तरी तेथें एक क्षणभर देखील राहूं नये. (२२) असा विचार करून मन बिघडून दक्षप्रजापति पुनः आपल्या आश्रमाला परत आला. आपला अपमान झाल्यामुळें मन प्रशस्त नसलेला दक्ष हा आपल्या आश्रमांत येऊन विश्रांति घेऊन बसला असतां त्याला त्याच्या बायकोनें (प्रसूतीनें) असें विचारिलें कीं—महाराज, कैलासाला जावयाच्या दर्शनाकरितां आपण गेलां होतां तेथें आपल्यास लाभ काय झाला ? माझी मुलगी आपल्या नवऱ्याशीं बऱ्या रीतीनें असलेली आपण पाहिली ना ? बरें, आपलें तोंड किंचित् उतरलेलें दिसतें यामुळें माझ्या मनांत भीति उत्पन्न झाली आहे. याकरितां काय झालें तें सांगावयाचें नाहीं काय ? याप्रमाणें विचारिल्या बरोबर आपल्या सुशील बायकोला त्यानें असें ह्मटलें. अगे, आहे काय नाहीं काय, काय मला विचारून शिणवितेस. माझ्या पोटीं मुली झाल्या ह्मणून तुझ्या मनाला भीति वाटावयास कारण झालें. गृहस्थाश्रमामध्यें राहून आपल्याला कन्यासंतति पुष्कळ झाली ह्मणून धन्यता मानून घेण्यापेक्षां सन्यासाश्रम घेऊन एकटें राहण्यांत अतिशय सुख आहे. पहा या संसा-

एव श्रेयान् स्वभावतः सुलभो बहुक्लेशासारः संसारः ॥ तत्र सकले-तरोपजीव्यतया बहुसंपत्संपादनायाससमुदितगुरुश्रमः पुनरयं द्वितीयाश्रमः तत्र कन्याबाहुल्यमनर्थसाकल्यं तदुपरि दुष्टजामातृपरिचरण-निष्ठा दुःखस्य पराकाष्ठा ॥ सर्वमनुभूयतेऽस्माभिः ॥ पद्यम् ॥ प्रथममभृतभानोर्लोचनानंदमूर्तेः कतिचन किलदत्ताः कन्यका लोकमान्याः ॥ स मदुपहितशापस्तासु वैषम्यचारी समजनि च सलक्ष्मा संभवद्राजयक्ष्मा ॥२२॥ अन्याश्च धर्मादिपरिगृहीताः कन्याः सहजदैन्याः सर्वंमिदं नातिदुःसहम् अयमेव मनःशंकुरभंगुरः दुरुच्छेदा वा दुर्यशःपताकाः ॥ यदविदितपितृमातृजामाता पशुपतिरनाचारः सुचिरेण दुहितृदर्शनोत्कंठया गतं मां न च वाचाप्युपचचार न किंचिदंजलिघट-

---

रामध्यें वास्तविक विचार केला असतां सुखापेक्षां दुःखच ठिकठिकाणीं आढळतें. हें पहा आपल्या कुटुंबांत जितकीं माणसें असतात, तितक्यांचें उपजीवन चालावें ह्मणून द्रव्य मिळविण्यास कोण श्रम होतात, पहा, बरें हेंही असो, अशा या संसारांत आपल्या दुर्दैवानें पोटीं मुलीच पुष्कळ झाल्या ह्मणजे किती मनाला संताप होतो बरें ? असो. हेंही एकीकडे असो, पुढें मुलींचीं लग्नें करून दिल्यानंतर जावई दुष्ट जर निघाले तर त्यांचीं आर्जवें करितां करितां आपल्याला पुरेवाट होते. फार काय ? मला वाटतें येथें दुःखाची सीमाच संपली. सांगावयास कारण ह्मणजे प्रस्तुत आह्मांस हीं सर्व दुःखें अनुभवास येऊं लागलीं आहेत. प्रथमतः अमृत किरणाचा तो चंद्र रूपानें सुंदर व चार चौघांमध्यें पाहण्यालायक होता ह्मणून त्याला लोकमान्य माझ्या कांहीं मुली दिल्या. पुढें तो आपल्या मुलींशी सरळ बुद्धीनें वागला नाहीं ह्मणून त्याला माझा शाप बसला, त्यामुळें तो कायमचा क्षयरोगी झाला. (२२) आतां धर्मादिकांना कांहीं मुली दिल्या आहेत परंतु त्यांच्या घरचें दैन्य कांहीं जात नाहीं. यावरून विचार केला असतां हें सर्व सहन करावयास अशक्य वाटतें. हाच जो शंकु (खिळा) मनांत मारलेला आहे, तो काढण्यास अशक्य असून मजबूत बसलेला आहे. यामुळें आपल्याला लोकांत जें अपयश आलें, तें कांहीं केलें तरी जात नाहीं. त्यांतल्यात्यांत असें झालें कीं धड ज्याला आई नाहीं आणि बाप नाहीं असा तो पशुपति मोठा अनाचारी निघाला आहे, तुला काय सांगूं ? पुष्कळ दिवस झाले ह्मणून आपल्या मुलीला पाहून यावें ह्मणून सहज तिकडे गेलों होतों, त्या माझा सत्कार त्या दुष्ट जावयानें नुसत्या फुकाच्या चार अक्षरांनीं देखील केला नाहीं मला पाहून त्यानें हात जोडले

नया वा दूर एव प्रणामेन वा ॥ पद्यम् ॥ नित्याग्निहोत्री निकषः श्रुतीनां स्वाचारपूतः सुत एव धातुः ॥ कस्यात्र लोके न भवामि पूज्यः कपालिनं तादृशमंतरेण ॥२३॥ विद्यामदेन कतिचिद्बहुमन्यमानाः स्वात्मानमेव न गुरूनपि संनमंति ॥ संल्लापमात्रमपि सादरमागतेषु साम्राज्यदानमिव दुर्लभतां नयंति ॥२४॥ किमस्य गर्वाय ॥ व्याख्याति श्रियमस्य दिग्वसनता रूपं विरूपाक्षता संशुद्धिं पितृकाननप्रणयिता धर्मं गुरुद्रोहिता ॥*आमुष्यायणतान्वयस्य* विरहात्कुत्रापि जात्यप्रदां मन्ये संप्रति शूलिनः स्मयकरी विद्या विशेषज्ञता ॥२५॥ किमस्य गर्वनिर्व्यूढया विद्यया वा प्रयोजनं विनय एव हि विद्यावतामाभरणम् ॥ पद्यम् ॥ लज्जया भरिता वेश्या लक्ष्मीर्लोभेन संगता ॥ विद्यागर्वोपरक्ता च सद्यः प्रलयमश्नुते ॥२६॥ब्राह्मणेन विना संसद्ब्राह्मणो विद्यया

---

नाहींत, दुरून देखील नमस्कार केला नाहीं. मी नित्याग्निहोत्री असून वेदांमध्यें मोठा पंडित ह्मणवून घेतों, व सदाचरणांनीं परम पवित्र असून प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा मुलगा ह्मणवून घेतों. असा मी त्या कपालीशिवाय ( कपाल घेऊन भीक मागणाऱ्या शिवाशिवाय ) कोणाला या जगांत पूज्य नाहीं ! (२४) कांहीं लोक विद्येच्या मदानें अंध होऊन आपल्यालाच जगांत श्रेष्ठ मानून घेतात तसले लोक गुरुजनांचा सत्कार कांहीं करीत नाहींत. फार काय ? आपल्या घरी आलेल्या दुसऱ्याशीं सत्कारानें फुकाचे दोन शब्द काढावयाचे ह्मणजे त्यांना साम्राज्यदान केल्याप्रमाणें वाटतें. (२५) बरें गर्व करण्यासारखें याच्याजवळ आहे तरी काय? तें तरी पहा बरें ! याची संपत्ति ह्मणजे स्वतः दिगंबर होऊन जगांत भटकतो, रूपाकडे पाहावें तर डोळे काय वेडेवांकडे आहेत पहा ; सदाचरण पाहावें ह्मटलें तर नेहमीं स्मशानांत करमणूक करतो, धर्म करतो ह्मणावें तर आमच्या सारख्या-गुरूंचा द्रोह घेतो, शिवाय याचा वंश नसल्यामुळें कोठेंही याची जात सांपडत नाहीं, परंतु सांप्रत विचार केला असतां या पशुपतीच्या ठिकाणीं आश्चर्य करण्यासारखी एक सर्व जाणण्याची शक्ति असलेली मोठी विद्या मात्र आहे. (२६) असें जरी आहे तथापि अशी ही गर्वाची विद्या काय उपयोगाची बरें ! विद्यावान लोकांचें मुख्य भूषण ह्मणजे विनयगुण होय. नायकिणीनें लाज धरिली तर ती तात्काळ नष्ट होते. लक्ष्मीच्या ठिकाणीं लोभ नसला तर लक्ष्मी जाते ( लोभी मनुष्याजवळ लक्ष्मी राहते. ) विद्या गर्विष्ठाजवळ असली तर नष्ट होते. (२७) सभा विद्वान ब्राह्मणांशिवाय शोभत नाहीं, ब्राह्मण विद्येशिवाय शो-

विना ॥ विनयेन विना विद्या न विभाति कदाचन ॥२७॥ विद्यावलेप-शून्या वेशवधूरपि च वंचनारहिता ॥ सुलभा न भवति लोके परहिंसालेशवर्जिता प्रभुता ॥२८॥ गद्यम् ॥ किमनेन विद्यादुर्विदग्धेन गर्वग्रंथिलचेतसा धूर्जटिना ॥ तत्संगतया सुतया वा ॥ कृतस्य प्रतीकारमविधाय कृतिनां न निद्राति हि नयनम् ॥ अतो वयमपि महाक्रतुमारभ्य महेंद्रादिकाः सर्वा देवताः यक्षामहे ॥ सभर्तृकाः सर्वा दुहितृः समाहूय सत्करिष्यामः ॥ कपालिनमवलिप्तं तत्परिगृहीतामात्मजां च विनाऽसुदृढोयमध्यवसायशंकुरिति विशृंखलमभिहितवति भर्तरि प्रसूतिरपि पुनरेवमब्रवीत् ॥ स्वामिन् कदाचिदपि नैवमभिधातव्यम् ॥ पद्यम् ॥ प्रागेव दानात् कन्याया वरस्य गुणचिंतनम् ॥ वूढोऽयमपि तद्भर्ता निर्गुणोऽपि गुणार्णवः ॥२९॥ दुर्वृत्तो वा सुवृत्तो वा दुर्बुद्धिरथ वा सुधीः ॥ संपूज्य एव जामाता सर्वैर्दुहितृबंधुभिः ॥३०॥ विद्या-

---

भत नाहीं, विद्या विनयाशिवाय कधींही शोभत नाहीं. (२८) गर्व नसलेली विद्या, न फसविणारी नायकीण, नोकरांची हिंसा न करणारा प्रभु अशा या तीन वस्तु जगांत फारच थोड्या सांपडतील. (२९) हा पशुपति मोठा विद्वान आहे खरा, परंतु याचें मन गर्वानें आंधळें झालें आहे. याकरितां याला घेऊन काय करावयाचें आहे. आणि त्याच्या सहवासामध्यें असलेल्या आपल्या मुलीला तरी घेऊन काय करावयाचें आहे. असो ज्यानें कृति केली असेल त्याला प्रतिकृति केल्याशिवाय मानी लोकांच्या डोळ्याला झोंप ह्मणून यावयाची नाहीं. याकरितां आह्मी देखील एक मोठा यज्ञ सुरू करून महेंद्रादि सर्व देवांची आराधना करूं. त्या समारंभाला बाकीच्या सर्व मुली त्यांच्या नवऱ्यासह बोलावून त्यांचा सत्कार आपण करूं परंतु त्या समारंभाला शिवाला आणि त्याच्या बायकोला मात्र बोलवावयाचें नाहीं. असा विचार करून मनांत तें शल्य धरून उच्छृंखलपणें दक्ष बोलत असतां पुनः ती प्रसूति ह्मणाली. महाराज, कधींही असें आपण बोलूं नये. कारण कन्यादान करावयाच्या अगोदर वराचा गुणदोष पाहावा लागतो, लग्न करून दिल्यानंतर मुलीचा नवरा मोठा दुर्गुणी असला तरी तोच गुणसमुद्र आहे असें धरून चालावें लागतें. (३०) वाईट वागणुकीचा असो, चांगल्या वागणुकीचा असो, दुष्टबुद्धीचा असो, चांगल्या बुद्धीचा असो, तो जावई मुलीच्या पक्षाच्या कोणत्याही लोकांकडून पूज्यच होतो. (३१) कन्येच्या पक्षाकडील

वंतोऽपि सद्वृत्ताः वधूवंशस्य बांधवाः ॥ वरवर्गैर्न गण्यंते कन्यावत्ता हि दुर्भगा ॥३१॥ मृष्टान्नेषु मृषारुचिः सुवसने दर्पादिवानादरः सांत्वोक्तौ कुटिलोक्तयः किल सुहृद्भावेऽपि सा सूयता ॥ प्राप्तेषूत्सववासरेषु च पुनः सद्यः प्रयाणोऽद्यमस्तज्जामातृपदांकितो न कुरुते किं नाम दुश्चेष्टितम्॥३२॥कीदृशीयं विधिचोदना ॥ पेशलमपि शीलं वा पतिव्रतानां पतिवचनमुल्लंघ्यकारः प्रतीकारः स्वप्नेऽपि कुतः स्त्रीणाम् स्वातंत्र्यं पतिधर्म एव स्त्रीणामपि धर्मः ॥ न हि दंपत्योः पृथगस्ति कर्म वैदिकं आमनंति हि जायापत्योः न भागो विद्यत इति ॥ तदिदानीं शिवदूषणदक्षया दीक्षया सह महामखदीक्षा समारभ्यते ॥ भाविनः फलस्य परिज्ञातभगवानघटितघटनापटीयान् विधिरेव ॥ अनर्थानामागमनद्वारमसदृशः संबंधः ॥ पद्यम् ॥लुब्धा शक्तिरियं त्रिलोकजननी शंभोश्च या ते सुता तां तस्मै वितरेति पूर्वमवदन्मातामह-

---

लोक विद्वान असोत, सदाचरणी असोत, परंतु वरपक्षाकडील लोक त्यांची गणना कशांतही करीत नाहींत कारण मुली पोटीं निपजणें हेंच मोठें दुर्दैव समजावें. (३२) चांगलीं पक्वान्नें केलेलीं असलीं तरी तीं बेचव झालीं आहेत, असें ह्मणणें, अमोलिक वस्त्रें दिलीं तरीं गर्वानें तिरस्कार करणें, शांतपणें भाषण केलें तरी वांकडेंच बोलावयाचें, कितीही आपण स्नेहभाव व्यक्त केला तरी असूया दाखविणें, घरीं मंगल कार्यें असलीं तरी बायकोला घेऊन आपल्या घरीं जाण्याचा उद्योग करणें वगैरे चेष्टा जगांत कोणता जावई करीत नाहीं बरें ? (३३) अथवा नशिबाची प्रेरणा काय सांगावयाची आहे? कारण सुंदर स्वभाव आहे, परंतु पतिव्रता स्त्रियांना आपल्या नवऱ्याची आज्ञा मोडावयाचें साहस स्वप्नामध्येंही होत नाहीं. आपलें स्वातंत्र्यही पतिच असतो, आणि पतिधर्मच स्त्रियांचा धर्म होय. दंपतीमध्यें परस्पर निरानिराळे धर्म नसतात, वैदिककर्म दंपतीमध्यें परस्परांच्या साह्यानें करावें लागतें. आणि निराळा भागही नसतो. तर सध्यां शिवदूषण करण्यांत अग्रेसर अशी दीक्षा घेऊन दक्षानें मोठा यज्ञसमारंभ आरंभिला, त्याला अर्थात प्रसूतीचें अनुमोदन असलेंच पाहिजे. पुढचीं फळें यावयाला कारण अघटित घटना करणारें नशीब आहे. आणि याला अनुसरून अनर्थ कोसळण्यास अयोग्य संबंधही घडून येतो. त्रैलोक्याची माता शंभूची शक्ति तुमची मुलगी झाली, अशा या मुलीला श्रीशंकरास देण्याविषयीं पूर्वी त्या ब्रह्मदेवानेंच सांगितलें.

स्तत्कृतम् ॥ मातृभ्रातृपितृत्वपूर्वगणनानैपुण्यलोकाश्रया ये कर्मण्यतिलौकिके स्थितिजुषस्तेषां कुतोऽस्मत्स्पृहा ॥३३॥ गद्यम् ॥ महतीं देवतामनादृत्य वर्तमानोऽयं महाक्रतुः कस्य वा मंगलमावहति किं महत्या देवतया देवतांतरैर्वा पतिदेवता हि नार्यः शुभमशुभं वा भर्तृधर्मतया तावदनुसरामि ॥ इति संचितयंती सा प्रसूतिः दक्षस्य भर्तुस्तादृशेऽपि कर्मणि सहचारिणी बभूव ॥ पद्यम् ॥ तत्रांतरे समाहूताः सर्वे यज्ञांशभागिनः॥पुरंदरमुखा देवाः सकुटुंबाः समागताः॥३४॥ न जग्मतुस्तौ नलिनासनाच्युतौ मखाय दक्षस्य महेश्वरद्विषः ॥ विचिंत्य विश्वाधिकतामुमापतेस्तदाज्ञयानर्थगतिं च भाविनीम् ॥३५॥ मुनयो मुदिताः समाययुस्तं महिता दक्षमखं विचारशून्याः ॥ शिवदूषणदग्धमीक्षमाणाः शिवमाहात्म्यविदो न गौतमाद्याः ॥३६॥ तदंतरे दक्षमुनेर्विचेष्टितं स्वयं विदित्वा स्वविबोधचक्षुषा ॥ समाप चिंतां म-

---

तसें त्वां केलें. परंतु ही आमची आई, हा आमचा बाप असा जो व्यवहार आहे तो लौकिकव्यवहार होय. असें असतां जे लोक लौकिकमार्ग सोडून पलीकडे राहिले आहेत, त्यांना आमच्याप्रमाणें लौकिकविषयक इच्छा कशी होईल बरें ? (३४) अशा मोठ्या देवतेचा अनादर करून हा यज्ञसमारंभ सुरू केला तर कोणाला कल्याण होणार आहे ? अथवा अशा मोठ्या देवतेलाच नाहीं इतर देवांनाहीं घेऊन मला काय करावयाचें आहे ? कारण स्त्रियांचा धर्म ह्मणजे पतीचा जो धर्म असेल तोच होय, पतिच मुख्य दैवत स्त्रियांचें होय. तें शुभ असो, अशुभ असो, पतिधर्म असल्यामुळें तिकडेच आपणही अनुसरावें, असा मनांत विचार करून ती प्रसूति तशाही त्या भयंकर कर्माला अनुसरून चालली. इतक्यांत यज्ञांतील अंश घेण्याविषयीं इंद्रादि सर्व देवांना बोलाविलें नंतर तत्क्षणींच ते सर्व देव आपापल्या बायकांसह त्या समारंभाला चालले. (३५) परंतु ब्रह्मदेव आणि विष्णु हे दोघे मात्र शिवद्वेषी दक्षाच्या यज्ञाला गेले नाहींत. कारण सर्व जगांत उमापतिशिवाय दुसरी कोणतीही देवता श्रेष्ठ नाहीं अशी समजूत असल्यामुळें पुढें होणाऱ्या अनर्थाला हे दोघे जाणून होते. (३६) त्यांमध्यें विचारशून्य असे जितके ऋषि होते, तितके सर्व मोठ्या आनंदानें दक्षयज्ञाला आले. परंतु तो समारंभ शिवदूषणानें भरलेला असल्यामुळें शिवाचें माहात्म्य जाणणारे गौतम वगैरे मुनि गेले नाहींत. (३७) इतक्या अवकाशांत आपल्या ज्ञानाच्या द्वारानें दक्षाची चेष्टा स्वतः जाणून सर्व संगीत कलेंत निपुण असलेल्या नारदानें आप-

नसेति नारदः समग्रसंगीतकलाविशारदः ॥३७॥ त्रैलोक्यैकगुरुः सुरेंद्रमुकुटासंहृष्टपादांकितो जामातेऽत्यभिवादनं स्पृहयते साक्षान्महादेवताम् ॥ तस्मै द्रुह्यति तत्प्रियेति तनयां दक्षो न संमन्यते प्राप्ता हंत कुतोऽस्य बोधजलधेः पापीयसी वासना ॥३८॥ पुत्राणां प्रथमः सरोजवसतेः पूतः सतां दीक्षया विद्यानामधिदेवता विमलया कीर्त्या जगद्भूषणः ॥ सत्संतानमणिप्रदीप्तभुवनः सीमा तपस्तेजसो दक्षोऽयं शिवनिंदनादुपहतो हंतास्य सर्वे गुणाः ॥३९॥ दक्षो दक्षतु दुर्मनाः क्रतुविधौ दीक्षां शिवद्वेषिणो मूढाः किं मुनयोऽप्यमी तदिह यैरार्त्विज्यमारभ्यते ॥ इंद्राद्या अपि देवताः कथमितो हव्याशया संगताः सर्वेषां भवितव्यता बलवती केनापि नो वार्यते ॥४०॥ तदिमं वृत्तांतं त्रिभुवनजनन्यै निवेदयिष्यामि विशृंखलमुज्जृंभतां जगति कलहकोलाहलः नारदः कलहकुतूहलीति न मृषा भवतु यशःकंदली युक्तमेतत्॥पद्यम्॥

---

त्या मनांत असा विचार केला कीं, (३८) त्रैलोक्यांचा मुख्य गुरु व मोठे मोठे देवेंद्रप्रभृति देवही ज्याच्या पायाला आपलें कपाळ घासतात अशा त्या महादेवाला हा आपला जावई आहे असें समजून त्याच्याशीं हा दक्षमुनि द्रोह करतो आणि त्याची ती बायको ह्मणून तिलाही मानीत नाहीं, अशा मोठ्या ज्ञानी दक्षाला ही पापवासना कोठून उत्पन्न झाली हें समजत नाहीं. ही फार दुःखाची गोष्ट आहे. (३९) ब्रह्मदेवाचा पहिला मुलगा असून सज्जनाच्या दीक्षेनें परम पुनीत असून विद्येमध्यें मोठा निष्णात असून व कीर्ति चांगली निर्मळ असून जगाला भूषणासारखा असून रत्नांप्रमाणें उत्तम संतति घरांत चमकत असून तपश्चर्येनें मोठा तेजस्वी असून केवळ शिवनिंदा केल्यामुळें दक्षाचे सर्व अमोलिक गुण नाहींसे झाले ही दुःखाची गोष्ट आहे. (४०) बरें शिवनिंदेनें दुष्ट मन झालेला हा दक्ष यज्ञ आरंभ करो, परंतु ज्या ऋषींनीं या यज्ञांत ऋत्विजपणा पत्करिला आहे, त्यांची देखील बुद्धि कशी गेली बरें ? व हे इंद्रादिदेव देखील केवळ हव्य खाण्याच्या आशेनें कसे आले असतील ? यावरून सर्वांचें नशीब ओढवलें ह्मणावयाचें. भवितव्यता कोणाला चुकणार आहे? (४१) असो ही सर्व बातमी त्रैलोक्याची माता श्री अंबिकेला सांगतों. जगामध्यें कोलाहल उच्छृंखलपणें माजो. नारद हा कलहप्रिय आहे असें ह्मणतात, तें खोटें न होवो, ही माझी कीर्ति जगांत दुमदुमून राहो. जगांत कांहीं लोक तपश्चर्येनें काळ घालवितात आणि

कतिचित्तपसा नयंति कालं कतिचिद्वा परिशीलनात्कलानाम् ॥ मम ते दिवसा भवंति वंध्याः कलहोत्पादनकर्म येषु न स्यात् ॥४१॥ अथवा महापातकसहस्रसमे महादेवदूषणे वैदिकसदसि केन चिदविवेकिना प्रवर्त्यमाने विवेकिना केनापि निर्विचारेण न भवितव्यम् इति संचिंत्य देवमुनिर्दिदृक्षुर्दाक्षायणीं तदावासं कैलासमयासीत् तत्र तत्र चाव्यवहितः शनैः शनैः अंतःपुरं प्राविशत् ॥ पद्यम् ॥ मध्ये तदंतर्मणिमंटपस्य माणिक्यभद्रासनमानयंतीम् ॥ सखीभिरध्यासितपार्श्वसीमाम् शशांकलेखामिव तारकाभिः ॥४२॥ विनिर्मलस्फाटिकरत्नपीठे विन्यस्तपादांवुजशोभमानाम् ॥ मुखाभिरम्यादिव निर्जितेन चंद्रेण संभावितपादपीठाम् ॥४३॥ पर्यन्तकांतापरिवीज्यमानप्रकीर्णतालीपरिशोभितेन ॥ अन्योन्ययुद्धाकुलहंसवीतपद्माभिरामेण मुखेन कांताम्॥४४॥वैडूर्यभित्तौ मणिमंडितासु वितानमुक्तास्वपि बिंबितांगीम्॥

---

कांहीं लोक चांगल्या कला संपादण्यामध्यें काळ घालवितात, परंतु ज्या दिवशीं मला भांडण सांपडत नाहीं तो दिवस वायफळ गेल्याप्रमाणें वाटतो. (४२) अथवा हजारो महापातकांच्या बरोबरीचें हें महादेवाचें दूषण वैदिकांच्या सभेंत कोणत्या एका अविवेक्यानें चालविलें असतां विवेकी कोणत्याही मनुष्यानें विचार सोडून राहूं नये. असा विचार करून देवमुनि नारद हा दाक्षायणीला पाहण्याच्या इच्छेनें त्यांच्या स्थानाला ह्मणजे कैलासाला गेला. तेव्हां त्या त्याठिकाणीं प्रतिबंध न होतां हळुहळु अंतःपुरांत त्यानें प्रवेश केला. त्या अंतःपुरामध्यें मणिमंटपाच्या मध्यभागीं रत्नमय भद्रासनावर ती सती बसलेली होती, तिच्या भोंवतीं तिच्या सखी सगळ्या बसल्या होत्या त्यामुळें तारागणामध्यें चंद्राच्या रेषेप्रमाणें शोभत होती. (४३) व निर्मळ अशा स्फटिकाच्या रत्नखचित पीठावर पाय ठेवून बसल्यामुळें तिच्या सुंदर मुखानें चंद्राचा पराभव केला ह्मणून तो चंद्र तिच्या पायाची सेवाच जणुं करतो कीं. काय असें वाटत होतें. (४४) त्या सतीच्या सभोंवतीं सुंदर सुंदर स्त्रिया उभ्या असून हातांत ताडाचे पंखे घेऊन वारा घालीत होत्या त्या शोभेनें असें दिसत होतें कीं, परस्पर युद्ध करून हंसांनीं जिकडे तिकडे कमळाच्या पाकळ्या पाडलेल्या असल्या ह्मणजे त्या जशा दिसाव्या त्यामाणें सुंदर मुखानें युक्त असलेल्या मनोहर स्त्रीप्रमाणें ती सती दिसत होती. (४५) वैडूर्यमण्याच्या भिंतीवर रत्नखचित छताच्या मोत्यांच्या झालरींत प्रति-

एकामपीशस्य मनः प्रियाया मूर्तीरनेका इव धारयंतीम् ॥४५॥ सखीकरांदोलिततालवृंतनिवार्यमाणैरपि निष्पतद्भिः ॥ धम्मिल्लमालासवजातवांछैर्वाचालपार्श्वैर्मधुपप्रपंचैः ॥४६॥ मुग्धेन नासाभरणायमानमुक्तारुचार्धासनसंश्रितेन ॥ स्मितेन ताटंकमणिप्रभाभिर्वद्धोपगूहेन विराजमानाम् ॥४७॥ उत्संगसंगामुपरिस्तनाग्रहारत्विषा हंसरुचिं प्रपन्नाम् ॥ परामृशंतीं मृदुलेन लीलापारावतीं पाणिसरोरुहेण ॥४८॥ हरस्य पाणेरवतीर्य यातमात्मेच्छया बालमृगं पदांते ॥ आलोकयंतीं हरितोपलाभां माणिक्यमंजीररुचिं लिहानम् ॥४९॥ कुबेरपत्न्या प्रहितैर्निबद्धां सख्यर्पितां चैत्ररथप्रसूनैः ॥ मालां समादाय समागताय विहस्य लीलाकपये दिशंतीम् ॥५०॥ वाचालवीणां पुरतो वसंत्या वाण्या कृतं मंगलगीतबंधम् ॥ ताटंकसंताडितगंडभागं संश्लाघमानामसकृ-

---

बिंब पडल्यामुळें श्रीशिवाची प्रिया ( आवडती बायको ) एकटीच असली तरी पुष्कळ असल्याप्रमाणें दिसत होती. (४६) त्या सतीच्या सभोंवतीं राहून ताडाच्या पंख्यांनीं तिच्या सख्या वारीत असल्या तरी सतीच्या वेणींतील फुलांच्या सुगंधाला लुब्ध होऊन त्या फुलावर भुंगे सर्व पडून विवाद करतात कीं काय असा भास होत होता. (४७) नाकांत नथ घातल्यामुळें त्या मोत्यांच्या अर्ध्या आसनावर बसलेल्या तिच्या मंद हासानें व कानांतील रत्नांच्या बुगड्यांच्या कांतीनें ती सती शोभत होती ( नाकांत नथ घालून मंदहास करीत बसलेली असल्यामुळें व तशा गालावर बुगड्यांचा प्रकाश पडल्यामुळें ती सती विशेषेंकरून शोभत होती असें तात्पर्य ). (४८)त्या सतीच्या मांडीवर पारवा बसला होता. त्या पारव्यावर सतीच्या स्तनकलशावरील हारांची कांति पडली होती, त्यामुळें त्या पारव्याला हंसाची शोभा आली होती, अशा त्या पारव्याच्या पाठीवरून ती सती हात फिरवीत होती. (४९) श्रीशिवाच्या हातांतून उतरून आपल्याच इच्छेनें पायाजवळ खेळत असलेला हरिण हिरव्यागार गवताप्रमाणें भासत असलेल्या हिरव्या मण्याच्या तेजाला चाटीत उभा होता, त्या हरिणाला ती सती पाहत होती. (५०) चैत्ररथ नांवाच्या बागेंतील फुलें कुबेराच्या बायकोनें पाठविलीं होतीं तीं घेऊन माळ करून हंसत हंसत आपल्या खेळण्यांतील एका वानराच्या हातांत देऊन खेळत ती सती बसली होती (५१) दुसरीकडे हातांत सतार रुद्रवीणा वगैरे घेऊन मंगलकर गीत रचून श्रीसरस्वती गात होती तें ऐकून आनंदानें त्या गायनाची प्रशंसा ती सती करीत होती. तेव्हां तिच्या गालावर बुग-

त्प्रमोदात् ॥५१॥ पर्यंतपद्मासनमाश्रयंत्या प्रमोदयंत्या परिहासवाक्यैः॥ ईषद्रणत्कंकणरत्नजालं लक्ष्म्याऽसकृत्संकलिताक्षलीलाम् ॥५२॥ तामंबिकां शंकरधर्मपत्नीं संदर्शितां प्राप्य सखीजनेन ॥ प्रणम्य मूर्ध्ना पदवीथिकांते भेजे तदादिष्टमथासनं सः॥५३॥गद्यं॥ततस्तदादिष्टया मालिन्या सम्यगुपपादितसकलोपचारविधिः स तपोनिधिः संताडनक्रममुखतंत्रीसरसरवांकुरावतारः तस्याः स्तुतिबंधमकरोत् ॥ पद्यम् ॥ जय जय शंभुकुटुंबिनि जय जय जगदवनदक्षवामांगे ॥ जय जय मंगलरूपिणि जय जय मोहांधकारकौमुदिके ॥५४॥ शक्तिस्त्वमद्वितीया सकलजगज्जननि शक्तिमानीशः ॥ युवयोर्न विनाभावो भवति यथा देवि चंद्रचंद्रिकयोः ॥५५॥ सत्तामाहुरिमे त्वां तदाश्रयं शंभुमेव कर्तारम् ॥ सकलप्रपंचमूलं सत्पदवाच्यं परं ब्रह्म ॥५६॥ इच्छादिशक्तिभे-

---

ड्या हालत होत्या (५२) एका पलंगावर पद्मासन घालून वसून थट्टेच्या गोष्टी सांगून एकीकडे लक्ष्मी सतीला संतुष्ट करीत होती व त्या लक्ष्मीसह वारंवार फासे खेळत असल्यामुळें हातांतील रत्नखचित कांकणें वाजत होतीं. (५३) अशा समयीं नारदानें आंत प्रवेश केल्यावरोबर सतीच्या सख्यांनीं श्रीशंकराची धर्मपत्नी साक्षात् अंबिका जेथें बसली होती त्या ठिकाणीं नारदाला नेऊन अंबिकेला दाखविलें. नंतर नारदमुनीनें अंबिकेला नमस्कार केला, पुढें त्या अंबिकेनें नारदाला बसण्याकरितां आसन दाखविलें त्या आसनावर नारदमुनि बसला. (५४) नंतर अंबिकेनें देवीला माळ करून घालणाऱ्या मालिनी नांवाच्या आपल्या सखीला नारदाची पूजा करावयास सांगितलें, त्या प्रमाणें तिनें सर्व उपचारांसह नारदाची पूजा यथासांग केली. नंतर नारदानें आपल्या हातांतील वीणा छेडून सुंदर आवाज काढून श्रीअंबिकेची स्तुति केली. भो शंभुपत्नि, तुझा जयजयकार असो. जगाचें रक्षण करणाऱ्या श्रीशिवाची सहचारिणि, तुझा जयजयकार असो. हे मंगलस्वरूपिणि, तुझा जयजयकार असो. मोहरूप अज्ञानाला घालविणाऱ्या चंद्रिके, तुझा जयजयकार असो. (५५) सर्व जगाची मातोश्री, तूं असाधारण शक्ति आहेस, साक्षात् शिव हे मोठे शक्तिमान आहेत, तुमच्या दोघांचा वियोग कालत्रयीही होत नाहीं. हे देवि, चंद्राचा आणि चंद्रिकेचा वियोग कधींतरी झाला आहे काय ? (५६) पंडितलोक तुला सत्ता असें ह्मणतात, त्या सत्तेला साक्षात श्रीशंभु आश्रय आहे असें ह्मणतात. सर्व जगाच्या उत्पत्तीला मूलकारण परब्रह्मवस्तु साक्षात शंभुच होय. ती परब्रह्मवस्तु तुझ्या शिवाय राहत नाहीं. (५७) हे देवि, इच्छा

दादीशानस्यादिदेवि जननी च ॥ ईशत्वं जनकत्वं धत्ते शंभुस्तवैव समवायात् ॥५७॥ तव मायाभित्तिगता त्रैलोक्यालेख्यमालिनी सैषा ॥ त्वं च त्वत्समवायान्मायी जगतो महेश्वरः कर्ता॥५८॥ओमिति पदमुपनिषदामंत्यनिविष्टादिमाक्षरमिति ॥ अभिधानमंबिके ते रहस्यमनुभावयंति विद्वांसः ॥५९॥ निरुपाधिसकलमंगलमूला त्वं सर्वमंगलाख्याऽसि॥ अत एव चांबिके त्वं हरोऽपि तव संगमेन शिवनामा ॥६०॥ आनंदशक्तिममृतामाहुस्त्वामेव निगमतत्वज्ञाः ॥ भवदीयसंगनियमात्परमानंदीति विश्वतः शंभुः ॥६१॥ परिमलकलेव पुष्पे प्रसादलक्ष्मीरिवामृतमरीचौ ॥ मधुरिमशक्तिरिवेक्षौ भवसि शिवे त्वं शिवे समादिष्टा॥६२॥गद्यं॥ इति हितमतिबंधं तापसं तं भवानीति प्रत्यावभाषे अपि कुशलं हैरण्यगर्भाय मुनये इयंतं कालं कस्य वा देशस्य वासतया परिग्रहादनुग्रहः कृतः असाधारणः खलु तवानुभावः ॥ पद्यम् ॥

---

वगैरे शक्तिभेदानें साक्षात ईशाला (शिवाला) जनकत्व (बापपणा) आलें आहे, तुला जननीत्व (आईपणा) आलें आहे. ईशत्व आणि जनकत्व हे दोनी धर्म तुझ्या संबंधामुळें श्रीशिवाच्या ठिकाणीं आहेत. (५८) तुझ्या मायारूप भिंतीवर त्रैलोक्यरूप मालाकार चित्र श्रीशिवानें तुझ्या संबंधानेंच रेखिलें आहे, ह्मणूनच श्रीशिवाला मायी आणि जगाचा कर्त्ता असें ह्मणतात. (५९) उपनिषदांच्या अग्रभागीं व शेवटीं "ॐ" असें अक्षर काय आहे त्याचा अर्थ तूंच आहेस, (प्रणव तुझें नांव आहे असें तात्पर्य आहें) या प्रणवांतलें रहस्य विद्वान लोक जाणतात. (६०) उपाधींनीं रहित अशा सर्व मंगलाला तूंच कारण आहेस ह्मणूनच तुला सर्वमंगला असें नांव आलें आहे. अशा तुझ्या सहवासानें साक्षात् शंभूला देखील शिव (मंगल देणारा) असें नांव प्राप्त झालें आहे. (६१) हे मातोश्री, वेदांतील तत्वें जाणणारे पंडितलोक तुला आनंदशक्ति आणि अमृता या नांवानें हाक मारतात. तुझ्या सहवासामुळें सार्वकाळ शिव आनंदाचा उपभोग घेताहेत असें ह्मणतात. (६२) फुलांतल्या सुगंधाप्रमाणें, चंद्राच्या किरणांतील प्रसन्नतेप्रमाणें, उसांतील माधुर्याप्रमाणें, श्रीशिवाच्या ठिकाणीं तूं आहेस. (६३) याप्रमाणें गीतबंध करून नारद गात असतां त्या तापसी नारदाला भवानीनें ह्मटलें कीं,— नारदा, तूं कुशल आहेसना ? हा काळपर्यंत कोणकोणत्या देशांत जाऊन तेथल्या लोकांवर अनुग्रह केलास बरें ? अरे, तुझा प्रभाव फार मोठा आहे. कारण असें

स्मरमायानिमग्नस्य बाह्यो हि जगतो भवान् ॥ दृष्टिर्यस्य शिलाप्राया स्त्रीणां सृष्टिसमष्टिगा ॥६३॥ इत्युक्तो देव्या स मुनिरवोचत् ॥ दाक्षायणि दक्षप्रजापतेर्जनयितुर्महाक्रतुरारभ्य प्रवर्तत इति दिशि दिशि यशःपटहध्वनिराकर्ण्यते अद्यापि देव्या न विचारितं मया किंचिदत्राश्चर्यमिव दृष्टम् किमिदमिति विचारयितुमागतोऽस्मि भगवति याः श्रद्धादयः धर्मपरिगृहीतास्त्रयोदश देव्या यवीयस्यः प्रख्याताः याश्चान्या भृग्वादिपरिग्रहा नव ख्यात्यादिकाः याश्चंद्रपरिग्रहा अश्विन्यादिकाः या दत्ता पितृभ्यः स्वधा नाम या चाग्नये स्वाहाख्या॥ ताः सर्वा अपि पित्रा दीक्षितेन सभर्तृकाः सापत्याः सादरमाहूताः संप्रति महायज्ञोत्सवे प्रमोदंते ॥ अत्रभवती ज्यायसी कथमनाहूता न गता महाध्वराय सर्वमिदं किमर्थमिति महती मे चिंता इति तदाकर्ण्य सुरमुनेः पितृसदनवृत्तांतं दाक्षायणी तदवलोकने परमकुतू-

---

कीं कामाच्या मायेमध्यें सर्व जग बुडालें आहे, परंतु तूं मात्र तशा जगापासून फार दूर आहेस. कारण सर्व सृष्टीप्रमाणें तुझीहि सृष्टी असून तुझी दृष्टि मात्र स्त्रियांविषयीं केवळ दगडाप्रमाणें झाली आहे. (६४) याप्रमाणें देवीनें प्रश्न केल्यावरोबर तो मुनि बोलला. भो दाक्षायणि, तुझा जनक अशा दक्षप्रजापतीच्या घरीं मोठा यज्ञसमारंभ चालला आहे, अशी कीर्ति जिकडे तिकडे पसरलेली ऐकण्यांत येत आहे. अजून देवीनें याचा विचार केला नाहीं ह्मणजे मला याविषयीं अतिशय आश्चर्य वाटतें. हें असें कसें झालें ह्मणून विचारण्याकरितां मुद्दाम मी येथपर्यंत आलों. हे भगवति, श्रद्धादि धर्माच्या ज्या तेरा बायका आणि तुझ्या बहिणी आहेत, व भृगुऋषीच्या बायका ख्याति वगैरे ज्या नऊ आहेत व चंद्राच्या बायका ज्या सत्तावीस अश्विनी वगैरे आहेत, पितरांची जी स्वधा नांवाची बायको आहे, व अग्नीची स्वाहा नांवाची जी बायको आहे या सर्व तुझ्या धाकट्या बहिणी यज्ञमहोत्सवांत तुझा पिता दीक्षा घेऊन बसला आहे ह्मणून या दक्षाच्या आमंत्रणावरून आपापल्या पतींसह त्या समारंभाला गेल्या असून तेथें त्या सर्व मोठ्या थाटांत आहेत परंतु या सर्वांची तूं वडील बहीण असून तुला आमंत्रण कसें नाहीं बरें ? आणि तूं कशी त्या उत्सवाला गेली नाहींस ? या सर्वांचा विचार केला असतां माझ्या मनाला मोठीच काळजी वाटते. याप्रमाणें दक्षाच्या घरची बातमी सर्व नारदमुनकिडून ऐकून दाक्षायणीला तो उत्सव पाह-

हलवती बभूव अमरमुनिरप्येवं कलहबीजमुत्पाद्य तदनुज्ञया पशुपतिं च प्रणम्य यथागतमयासीत् ॥ सा च दाक्षायणी साक्षात्पितृभवनमहोत्सवदर्शनोत्कंठा नीलकंठं पतिमुपसृत्य प्रणम्येवमप्राक्षीत् ॥ देव दक्षस्य मे जनकस्य महोत्सवः प्रवर्तते तदालोकने समुत्कंठते मम मानसम् गमनाय ममानुज्ञा दीयताम् इति प्रार्थितो दक्षसुतया विरूपाक्षः सकलभुवनवृत्तांतसाक्षी तामेवमवादीत् ॥ पद्यम् ॥ पितुः सहोदराणां वा बंधोरन्यस्य वा गृहम् ॥ आहूतैरेव गंतव्यमुत्सवेषु वरानने ॥६४॥ त्वत्सोदर्यो भर्तृभिश्चोपहूता न त्वं पित्रा दक्षजे दीक्षितेन ॥ यातायां त्वय्यादरं नैव धत्ते सत्कारो हि स्नेहपूर्वो जनानाम् ॥६५॥ यद्दर्शने यस्य मनःप्रसादः स तस्य बंधुः किल दूरगोऽपि ॥ जन्मादिरास्तामुपधिर्जनानां निदर्शनं कैरवबंधुरिंदुः ॥६६॥ अनादराणां

---

ण्याविषयीं अतिशय उत्कंठा लागून राहिली. इकडे देवर्षीनें याप्रमाणें कलहबीज रोवून त्या सतीची आज्ञा घेऊन परमेश्वराला नमस्कार करून तो मुनि जसा आला होता तसा परत आपल्या ठिकाणाला गेला. इकडे ती दाक्षायणी आपल्या पित्याच्या घरचा महोत्सव पाहण्याच्या उमेदीनें पति अशा नीलकंठाजवळ येऊन नमस्कार करून तिनें प्रश्न केला. महाराज, माझा पिता दक्ष याच्या घरीं मोठा उत्सव सुरू झाला आहे असें मी ऐकते, तो उत्सव पाहण्याविषयीं माझें मन धांवतें. याकरितां तेथें जावयास मला आपण आज्ञा द्या. याप्रमाणें विज्ञापना केल्याबरोबर त्रैलोक्यांतील भूतभविष्यवर्तमान जाणणारा साक्षात् पशुपति तिला याप्रमाणें बोलला. हे सुंदरी, पित्याच्या घरीं असो, भावांच्या घरीं असो, इतर भाऊबंदाच्या घरीं असो उत्सव होत असेल तर तेथलें आमंत्रण आलें तर जावें लागतें नाहींतर जाऊं नये असें शास्त्र आहे. (६५) तुझ्या बहिणींला व त्यांच्या नवऱ्यांला दीक्षित झालेल्या तुझ्या बापानें आमंत्रण केलें आहे, ह्मणून त्या गेल्या आहेत, हे दक्षपुत्रि, तसें आमंत्रण तुला आलें नाहीं, इतक्या उपर तूं तशीच जर गेलीस तर तुझा सत्कार अंतःकरणपूर्वक कोणीही करणार नाहींत अंतःकरण प्रशस्त असेल तर सत्कार होत असतो अशी जगांत रूढि आहे. (६६) ज्याला पाहावें ह्मणून ज्याचें मन प्रशस्त असेल, तो बंधु पुष्कळ दूर असला तरी तो जवळच आहे, असें वाटतें. आईबापांची गोष्ट एकीकडे राहो, परंतु तुला एक उदाहरण सांगतों पहा चंद्रापासून चंद्रविकासी कमल कितीतरी अंतरावर असतें परंतु चंद्रोदय झाल्याबरोबर तात्काळ फुलतें. (६७) जेथें आपला अनादर

सदनं ये गच्छंत्यविचारतः ॥ सद्यस्तेषां हि जायंते प्राणांताः परिभूतयः ॥६७॥ द्वेषिणः सदनं मागा जनकस्यापि वल्लभे ॥ प्रमदानां न कुशलं पतिवाक्यविलंघनम् ॥६८॥ गद्यम् ॥ एवमभिहितवति भगवति सा पुनराचक्षे दाक्षायणी ॥ स्वामिन् किमिदं निरूप्यते ॥ पद्यम् ॥ सत्कारं वा तिरस्कारं तन्वंतु जनकादयः ॥ स्त्रीणां हि जन्मसदनं स्नेहसारः प्रवर्तते ॥६९॥ आगर्भकालं प्रणयातिरेकाद्विवर्द्धितायामसुनिर्विशेषम् ॥ द्वेषः प्रजायां सुलभो न पित्रोः कृतेऽपराधेऽपि विचारपूर्वम् ॥७०॥ मया कृतः कोप्यपराधलेशो महेश न ज्ञायत एव पित्रोः ॥ कथं नु ताभ्यामपमानिता स्यां कालस्य जाने न विशेषकक्ष्याम् ॥७१॥ मद्भाग्यं सकलामरेंद्रतरुणीधम्मिल्लमालागलन्माध्वीपंकिलपादुकं मम महादेवीति नामांकितम् ॥ निःसापत्न्यकथांकुरा मयि विभो स्नेहप्रवृ-

---

होतो, त्याठिकाणीं विचार न करितां कोण मूर्ख जातो, त्याला त्याठिकाणीं मरणावस्थेचीं दुःखें अनुभवावीं लागतात. (६८) हे वल्लभे, तुझा बाप आहे खरा परंतु तो आपला शत्रु आहे याकरितां तेथें तूं जाऊं नकोस. नवऱ्याची आज्ञा जी बायको मानीत नाहीं, त्या स्त्रियेचें कल्याण कधींही होणार नाहीं. (६९) याप्रमाणें भगवान शंकर सांगत असतां ती दाक्षायणी पुनः बोलली. महाराज हें आपण काय सांगतां बरें? आईबाप तिरस्कार करोत, किंवा सत्कार करोत, स्त्रियांचें अंतःकरण माहेरीं गुंतून राहिलेलें असतें. (७०) गर्भाच्या कालापासून अतिशय अंतःकरणामुळें आपल्या प्राणाहीपलीकडे आईबाप लेंकरांचें रक्षण करीत असतात, अशा त्या लेंकरांनीं जाणूनबुजून जरी अपराध केला, तथापि आपल्या लेंकराविषयीं आईबापांचा द्वेष कधींही होत नाहीं. (७१) भो महेशा, मी तर आईबापांचा अपराध थोडा देखील केला नाहीं, व केल्याप्रमाणें मला वाटत नाहीं. असें असून माझे आईबाप माझा अपमान कां ह्मणून करतील बरें? याच्यावर त्यांनीं माझा अपमान केलाच तर कालाचा महिमा काय आहे तो मला कळत नाहीं. (७२) महाराज, माझें भाग्य पहावें तर देवांच्या तरुण तरुण स्त्रियांच्या वेणींतील फुलें रोज रोज माझ्या पायावर पडलेलीं असतात ( मला रोज सर्व स्त्रिया नमस्कार करतात असें तात्पर्य आहे ). इकडे माझें नांव पाहावें तर जगांतील सर्व लोक मला महादेवी असें ह्मणतात. माझ्यावरचें आपलें प्रेम पाहावें तर अतोनात आहे. माझ्या या प्रेमांत कोणीही सवत वांटेकरीण झाली नाहीं. अशी जरी वास्तविक स्थिति माझी आहे, तथापि माहेरीं जावें असें मला

त्तिश्च ते कांक्षे गंतुमथाप्यहं पितृगृहं का वान्यनारीकथा ॥७२॥ किं बहुना ॥भवत्प्रसादसंभावितया सर्वयापि संपदा समवेताऽहं पितृगृह- मुपेत्य चिरकालदृष्टान् जनकादीन् सर्वानपि दृष्ट्वा स्पष्टमात्मनः सक- लमपि सौभाग्यं दर्शयित्वा पुनरपि पादमूलमुपगच्छामि न तत्र क्षण- मपि निवसामि इति प्रियायाः पितृभवनगमनादरनिर्बंधमवधार्य पशु- पतिः पुनरुवाच वाचमुचिताम् ॥ पद्यम् ॥ मा निर्बंधान कांते मां गंतुं पितृगृहं प्रति ॥ पुनः पुनरनुज्ञाते याहि सर्वानुयायिभिः ॥७३॥ ऐश्वर्यं परमं रहस्यसरणेरद्वैतमाभ्यंतरं प्राणानां परिमेलनापरिमलः पारं र- सस्रोतसाम् ॥ आनंदोऽधिगिरां करं निरवधिर्लाभश्शरीरस्थितेः स- र्वं गौरि मम त्वमेव विरहप्रस्तावना कीदृशी ॥७४॥ नेत्रामृतांजनकले निरवधिकप्रेमपुष्पमधुधारे ॥ कल्याणि गौरि सहसा कथमिव विर- हाय साहसं कुरुषे ॥७५॥ किं बहुना ॥ नेत्राणामुपवास एव नियमो

---

वाटतें मग इतर बायकांची गोष्ट काय सांगावयाची आहे? (७३) फार काय सांगूं? तुमच्या अनुग्रहानें मिळालेली सर्व संपत्ति घेऊन पित्याच्या घरीं जाऊन तेथें सगळयांची भेट घेऊन तेथें जमलेल्या सर्व आप्तांना माझें ऐश्वर्य दाखवून, पुनः आपल्या पायाजवळ येते. त्याठिकाणीं एक क्षणभर देखील राहत नाहीं. या- प्रमाणें पित्याच्या घरीं जाण्याचा तिचा (सतीचा) हट्ट पाहून व ती गेल्या- शिवाय राहावयाची नाहीं असें जाणून पुनः श्रीशिव तिला बोलले. हे स्त्रिये, तुझ्या पित्याच्या घरीं जाण्याविषयीं मला मात्र तूं बांधून घेऊं नकोस. पुनः पुनः तूं विचारतेस ह्मणून सर्व परिवाराला बरोबर घेऊन एकटीच जा. (७४) हे देवि, माझें ऐश्वर्य ह्मणजे अद्वैतांतील परमरहस्य हेंच होय. रसप्रवाहाचा पली- कडचा कांठ ह्मणजे प्राणलिंगाशीं ऐक्य करणें हेंच होय. वेदवाणीच माझा आनंद होय. शरीराचा परमावधीचा लाभ ह्मणजे तूंच होय हें सर्व तुझ्याच ठिकाणीं लागूं पडतें (ह्मणजे हें सर्व तूंच मला आहेस असें तात्पर्य आहे). असें असून मला वियोग देण्याविषयीं तूं इच्छा करतेस हें कसें बरें? (७५) फार काय सांगूं? माझ्या नेत्रांला अमृताचें काजळ असल्या प्रमाणें हे देवि, निरवधिक (अतिशय) प्रेमरूप फुलांतील गंधधारे, (मला तूं अतिशय आवडती आहेस) मंगलकरगौरि, एकदम तूं मला विरह देण्या करितां एवढें मोठें साहस कसें कर- तेस?(७६) फार काय सांगूं माझ्या नेत्रांला आजपासून उपवासाचा नियम लागूं

निर्गंधमंतःपुरं विश्रांता रसकेलयः स्मरकलाविन्यासजीवातवः ॥ विश्वोल्लेखनवासनाविरहिणः स्वांतस्य बाह्ये रतिर्वा मृष्टो विषयो विशालनयने यावत्तवाभ्यागमः ॥७६॥ अयि प्रिये किमप्येतत् ॥ पतिव्रतानामधिदेवता त्वं प्रायः पिता ते मयि साभ्यसूयः ॥ मद्दूषणं तन्मुखतः प्रवृत्तं श्रुत्वा कथं सोढुमसि प्रवीणा ॥७७॥ यथारुचि गम्यतां शिवास्ते पंथानः संतु भवतु सुखोत्तरः परिणामः इति पतिवचनमाकर्ण्य तूर्णमेव समागता किमनया दूरक्रिययेति दाक्षायण्यपि तदाज्ञासंनिहितं रत्नविमानमधिरुह्य प्रयाणोन्मुखी बभूव ॥ ततस्तां प्रस्थानाभिनिवेशिनीं परिवृत्य परिवारयोषितः स्वस्वाधिकाराय प्रचक्रमिरे तथा हि काश्चन कन्याः पुरतः करकलितकनकदंडपटुरटितं प्रयाणपटहमताडयत् कापि कलधौतकाहालिमादधौ अन्या मंगलशंखमापूरयत् इतरा बभार मुक्ताविचित्रमातपत्रं अपरे मुखरितकंकण-

---

पडला, तूं जाणार ह्मणतेस यामुळें आजपासून हें अंतःपुर निर्गंध होऊन पडतें, सरस क्रीडा आजपासून माझ्या बंद पडल्या, माझ्या कामाच्या कळा निर्जीव पडल्या, हे सुंदरि, जगाची सृष्टि करावयाची वासना पार निघून गेली, आपल्या अंतःकरणाचें सुख सर्व तूं परत येईपर्यंत नाहींसें झालें. (७७) हे प्रिये, काय हें तुझें करणें बरें? तूं पतिव्रता स्त्रियांचें मुख्य दैवत आहेस. आणि तुझा बाप प्रायशः माझ्या ठिकाणीं असूया करतो. माझी निंदा त्याच्या मुखांतून निघालेली प्रत्यक्ष तूं ऐकून, सद्यः ती निंदा सहन करावयास कशी प्रवृत्त झालीस बरें? (७८) बरें आहे तुझ्या मनाला आवडेल त्याप्रमाणें तूं जा. तुला पुढचे रस्ते शुभकर होवोत, तुझा पुढचा परिणाम सुखावह होवो. याप्रमाणें पतिवचन ऐकून ती ह्मणाली कीं महाराज, असें भलभलतें कां बोलतां? असें आपल्या पतीला बोलून लौकरच ती सती निघाली. इतक्यांत दाक्षायणीनें पतीचे आज्ञेवरून आलेलें रत्नविमान पाहून त्यावर आरोहण करून पुढें ती लौकरच चालती झाली. याप्रमाणें आपल्या मनाच्या निर्धारानें आपल्या पित्याच्या घरीं जावयास जेव्हां ती सिद्ध झाली, तेव्हां तिच्या सभोंवतीं तिच्या परिवारांपैकीं सर्व स्त्रिया जमल्या आणि आपापल्या अधिकाराप्रमाणें काम करूं लागल्या. तें असें कीं,—कांहीं कुमारी देवीच्या पुढच्या बाजूला येऊन हातांत सोन्याची काठी घेऊन प्रयाणाचा नगारा वाजवूं लागल्या. कोण्या एका कन्येनें सोन्याचा काहळा ( कर्णा ) घेतला. दुसरीनें मंगल शंख घेतला; तिसरीनें मोत्याचें श्वेतच्छत्र देवीवर धरिलें. इतर कांहीं

माधूय चामरयुगलमुपर्यधातां काचन मणिपादुके बभार एका हेमकलां च दधती ददृशे परा कापि तांबूलकरंडवाहिनी परिसरमभजत कनककलशहस्ता काचिदुपस्थिता मुग्धा काचन मुक्तादर्शं दर्शयामास काश्चिदन्याः कर्पूरकरंडमाभरणमंजूषामंबरपेटिकाः क्रीडाशकुंतिकाश्च धारयंत्यः परिचर्यामाचरन् ततश्च क्षुद्रेतरविभवा रुद्रानुचरास्तामारक्षकाः पर्यधावन् एवं निरंकुशविभवाडंवितकरंभिता सरभसमंबिका नभसि मनोजवातिशयलंबमानेन विमानेन पितुराश्रममश्रममायासीत् तत्र सा विचित्राकारां समंततोऽपि चमत्क्रियमाणमकरतोरणाभरणां सर्वतोऽपि वध्यमानसहकारदलगर्भनिर्भरदर्भमालासहस्राम् अभितः स्थाप्यमानसफलपूगस्तंभरंभाकदंबमालामालंबमानविविधवितानांबरविरच्यमानमणिमुकुरचामरप्रालंबां एकतो गंधसलिलसिच्यमानवेदिकाव्यूहां अन्यत आस्तीर्यमाणरत्नासनविशेषपरंपरां अपरत आरभ्यमाणयूपस्थापनां इतरत आवद्ध्यमानयज्ञ-

---

स्त्रिया हातांतलीं कांकणें हालवीत देवीवर चौरी वारूं लागल्या. कोण्याएका स्त्रीनें रत्नमयपादुका घेतल्या. दुसरी सोन्याची कला घेतलेली तेथें दिसली आणि तिसरी तेथें आपल्या हातांत तांबूलाचा करंडा घेऊन उभी राहिलेली आढळली, तिसरी कोणी एक कन्या कडेवर सोन्याची कळशी घेऊन उभी होती, मुग्धावस्थेपर्यंत आलेली कोणीएक स्त्री हातांत मोत्याचा आरसा घेऊन उभी होती दुसऱ्या कित्येक स्त्रिया कापराचा करंडा, दागिन्याची पेटी, खेळण्यांतील पशुपक्षी वगैरे घेऊन देवीच्या सेवेकरितां तेथें हजर होऊन राहिल्या होत्या. नंतर अखंड ऐश्वर्यांचे रुद्राचे अनुचर देवीच्या रक्षणाकरितां ह्मणून तेथें जमले याप्रमाणें अप्रतिबंध ऐश्वर्यानें युक्त होऊन अतिशय वेगानें ती अंबिका मनोवेगापेक्षां जास्त वेग असलेल्या विमानांत बसून पित्याच्या आश्रमाला आली. त्याठिकाणीं विचित्र आकाराचीं, सभोंवतीं मकरतोरणांनीं अलंकृत झालेलीं, चोहोंकडे आंब्याचीं पानें व दर्भमूल बांधून सुशोभित केलेलीं, व चोहोंकडे केळीचे खांब व सुपारीचीं झाडें रोंवलेलीं असून चोहोंकडे नाना तऱ्हेचीं छतें मारलेलीं असल्यामुळें व सभोंवतीं रत्नाचे आरसे व चामरें लोंबत ठेविलेलीं असल्यामुळें शोभणारी, एकीकडे गंधोदकाचा सडा घालून चमत्कारिक वेदि केलेली असल्यामुळें शोभणारी, दुसरीकडे रत्नासनें ओळीनें आंथरून ठेवलेलीं असल्यामुळें शोभणारी, व दुसरीकडे यज्ञारंभाचा स्तंभ रोंवल्यामुळें शोभणारी, तिसरीकडे यज्ञांतील पशु बांधलेले असल्या-

**पशुस्तोमां एकत्र संस्तीर्यमाणयज्ञयूथोपकरणां क्वचिद्विचार्यमाणतंत्रावासां क्वचिन्निश्चीयमानविकल्पसमुच्चयव्यवहारां क्वचित्परिचीयमानप्रयोगशैघ्र्यां क्वचन संचीय्यमानसमिदाज्यकुशसंभारां क्वचिदालोच्यमानानुक्रमणिकां क्वापि निरीक्ष्यमाणशिक्षाकल्पव्याकरणादिकां क्वचिदारभ्यमानारणिमथनां क्वचिन्निरूप्यमाणप्रायश्चित्तप्रकारां क्वचित्संकल्प्यमानपूर्वांगां क्वचित्संकल्प्यमानार्त्विज्यविभागां आकल्प्यमानवेदिविस्तारां विकल्प्यमानविभेदां उपचर्यमाणमुनिमंडलां आहूयमानातिथिमंडलवर्गां आरोप्यमाणयाज्यदेवतासमवायक्रतुसुलभाडंबरां पितुर्यज्ञशालामालोकयत् तत्र स पित्राचारवृद्धतापसाधिष्ठितसमाजं दीक्षाक्षामवपुषं सह जनन्या जनकं दक्षमद्राक्षीत् । स च सपत्नीकस्तामाव्हानबहुमानमंतरेणापि समागतामतिमानुषविभवामपश्यत् ।**

---

मुळें शोभणारी, एकाच ठिकाणीं यज्ञांत लागणारे पदार्थ ठेविल्यामुळें सुशोभित दिसणारी, कांहीं ठिकाणीं शास्त्रार्थाचा विचार करीत विद्वान लोक बसले होते, त्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं मनांतलि सर्व संशय दूर करून निश्चयाचा ठराव सांगण्यांत येत असल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं विद्वान लोक बसून अतिशय जलदीनें प्रयोग करीत असल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं बसून समिधा आज्य दर्भ वेंचीत बसल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं अनुक्रमणिकेचा विचार करीत बसल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं शिक्षा व्याकरण पाहत बसलेल्या विद्वान लोकांच्या बैठकीमुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं अरणीचें मंथन आरंभ झाल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं प्रायश्चित्त सांगत बसलेल्या मुनिजनांच्या योगानें शोभणारी, कांहीं ठिकाणीं पूर्वांगाचा संकल्प करीत बसल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं ऋत्विजांच्या भागांचा संकल्प करण्यांत येत असल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं वेदींच्या विस्ताराची कल्पना चालल्यामुळें शोभणारी, पदार्थ निरनिराळ्या तऱ्हेनें मांडण्यांत येत असल्यामुळें शोभणारी, मुनिमंडलाच्या आदरसत्कारामुळें शोभणारी कांहीं ठिकाणीं अतिथींना बोलावण्यांत येत असल्यामुळें शोभणारी, कांहीं ठिकाणीं यज्ञांतील देवता सुलभपणें जमल्यामुळें सुशोभित दिसणारी, अशी पित्याची यज्ञशाला सतीनें पाहिली. त्या यज्ञशाळेंत आचारांनीं वृद्ध असे मोठमोठे तापस बसले होते त्यांना पाहिलें. आणि दीक्षा घेऊन बसल्यामुळें शरीर कृश होऊन गेलें होतें अशा आपल्या आईबापांना सतीनें पाहिलें. सपत्नीक अशा दक्षप्रजापतीनें मानवांना कधींही मिळणें शक्य

सर्वेऽपि तत्र साश्चर्यसंभ्रमं पर्यवारयन् ॥ पद्यम् ॥ सा तत्र शंभुदयिता जगतां सवित्री चक्रे प्रणामनियमं शिरसा पितृभ्याम् ॥ ताभ्यां तदाननविलोकनदुर्मुखाभ्यां नाशीरकारि कुशलं च न पृष्टमासीत् ॥७८॥ गद्यम् ॥ सर्वाः श्रद्धादयो यवीयस्योऽपि पितृमतानुवर्तनेन तां न प्रणेमुः न परिरेभिरे ॥ पद्यम् ॥ तथातिरूक्षमनसं दक्षं संवीक्ष्य चंडिका॥ स्मरंती भर्तृवाक्यानि वभाषे विहितांजलिः ॥७९॥ त्रैलोक्याधिपतिर्मम प्रियतमो नैवास्ति मे दुर्लभं तातं त्वां जननीमिमां च सहजा द्रष्टुं समुत्कंठिता ॥ आयाता स्वयमस्मि नैव भवते कृतोऽपराधो मया साक्षान्मत्पतिनापि संप्रति भवत्कोपस्य किं कारणम् ॥८०॥ सागस्स्वपि न कुप्यंति शांताः सर्वेषु जंतुषु ॥ अपत्येष्वपदोषेषु का कथा कोपसंभवे ॥८१॥ उपलालनतः प्रसादयोग्ये त्यज कोपं जनकाधुना जनेऽस्मि-

---

नाहीं अशा ऐश्वर्यांनें युक्त असलेली आपली मुलगी आमंत्रण नसतां आलेली पाहिली. परंतु त्याठिकाणीं सर्वही आश्चर्यांनें व संभ्रमानें जमूं लागले. जगाची मातोश्री अशा शंभूच्या भार्येनें आपल्या मातापितरांना शिर लववून नमस्कार केला तिच्या जननीजनकांनीं सतीचें तोंड देखील पाहिलें नाहीं, आपलींच तोंडें वांकडीं फिरवून तिला आशीर्वाद दिला नाहीं, आणि कुशलप्रश्नही केला नाहीं. (७९) व तेथें असलेल्या वहिणी तिच्याहून धाकट्या असल्या तरी आपल्या बापाच्या कलाला अनुसरून सतीला त्यांनीं नमस्कार केला नाहीं व प्रेमानें आलिंगन दिलें नाहीं. याप्रमाणें मन कलुषित झालेला आपला बाप दक्षाला पाहून तिला आपल्या नवऱ्याचें ( श्रीशिवाचें ) वाक्य आठवलें तेव्हां ती सती हात जोडून ह्मणाली. (८०) भो ताता, माझा पति त्रैलोक्याचा स्वामी असून मला जगांत कोणतीही वस्तु दुर्लभ नाहीं, परंतु ताता अशा तुला, व या लहान लहान वहिणींना, व आईला पाहण्याच्या उत्कंठेनें येथपर्यंत मी धांवून आल्यें. परंतु तुझा कोणताही अपराध मीं केला नसून व माझ्या पतीनेंही केला नसून विनाकारण माझ्यावर तुह्मी रागावलांत त्याचें कारण कांहीं मला कळत नाहीं. (८१) बाबा, स्वभावानें जे शांत आहेत, ते दुसऱ्यांनीं अपराध केले तरी त्यांच्यावर राग करीत नाहींत. अपराध न करणाऱ्या आपल्या लेंकरावर रागावण्याची गोष्ट तर दूरच राहिली. मग रागावावयास काय कारण बरें? (८२) भो जनका, बाळपणापासून तुह्मी माझें पोषण केलें ह्मणून तुमच्या अनुग्रहालाच मी पात्र असून विनाकारण माझ्या-

न् ॥ जलसेचनसत्क्रियोचिते कः परशुं पातयते विहारवृक्षे ॥८२॥ इत्युक्तः स तया दक्षो दाक्षिण्यगुणभूषया ॥ आचचक्षे पुनर्वाचमतिरूक्षां विचक्षणः॥८३॥ नमस्क्रिया कुतोऽभ्यस्ता भवत्या भववल्लभे ॥ या न दृष्टा पुराऽस्माभिस्त्वद्दिदृक्षासमागतैः॥८४॥पत्युरैश्वर्यगर्वेण भवती मोहिता सुते ॥ मामज्ञास्त पुरा तातं न जाने त्वामिहाधुना ॥८५॥ मुग्धेव किं न जानासि मूलं ते मोहसंपदः ॥ स्पष्टं तत्तव भर्तेव तामसैश्वर्यगर्वितः ॥८६॥ मुनिसंघे पुरा नास्मान् वाचाप्युपचचार यः ॥ सत्करोमि कथं वत्से त्वद्भर्तारं सुदुर्मतिम् ॥८७॥ आवासः पितृकानने परिहरंत्यार्यास्तु यद्दूरतो भूषा चास्थि विधीय्यते मुनिजनैर्यत्स्पर्शने शोधनम् ॥ कीर्तिर्ब्रह्मशिरःकपालहरणं यस्मान्न दोषः परो भर्तुस्ते

---

वर कां कोप करितां त्याकरतां राग सोडा. पाणी शिंपडून वाढवावयास योग्य अशा बागेंतल्या झाडावर कोणी कुऱ्हाड घालील काय ? (८३) दाक्षिण्यगुणांनीं शोभणाऱ्या सतीचें बोलणें ऐकून तो विचक्षण ( तर्कटी ) दक्ष वांकड्या वांकड्या शब्दांनीं आपल्या मुलीला ह्मणाला. (८४) हे भवानि, अलीकडे हा नमस्काराचा अभ्यास कोणीकडून केलास, कारण तुला पाहावयाच्या उमेदीनें आह्मी आल्यावेळीं हा अभ्यास दिसला नाहीं ह्मणून ह्मणतों. (८५) आपल्या नवऱ्याच्या ऐश्वर्याला भुलून त्यावेळीं तुझा तात असून याला तूं जाणिलें नाहींस. ह्मणूनच सांप्रत तुला मी कांहीं जाणीत नाहीं. (८६) संपत्तीला भुलून एकाद्या मूर्खाप्रमाणें तूं माझ्याशीं वागणूक ठेविलीस तुझा नवरा जसा तामस ऐश्वर्यानें मदांध झाला आहे, त्याप्रमाणें तूंही झालीस यावरून मोहाला कारण संपत्तिच आहे, असें दिसतें. (८७) पूर्वीं मुनिसमूह जमला होता, त्यावेळेस आह्मांला तुझ्या नवऱ्यानें नुसत्या वाणीनें देखील मान दिला नाहीं, तर हे वत्से सति, आतां दुष्टबुद्धीच्या त्या तुझ्या नवऱ्याचा सत्कार आह्मीं कसा करावा ? बरें, (८८) तो तुझा नवरा नेहमीं स्मशानांत भटकतो, मोठमोठ्या लोकांच्या वाऱ्याला देखील तो उभा राहत नाहीं, आंगावर हाडांचे दागिने घालतो, जीं हाडें मोठमोठ्या ऋषींनीं शिवलीं असतां पुनः त्यांस शुद्ध व्हावें लागतें, तीं तुझ्या नवऱ्याला पवित्र झालीं आहेत. त्याची कीर्ति पाहावी तर ब्रह्मदेवाचें डोकें त्यानें कापिलें ही त्याची कीर्ति होय. या दोषापेक्षां दुसरा दोष जगांत आढळावयाचा नाहीं, असें असून त्याला सर्व लोक शिव असें ह्मणतात, यावरून सर्व जग आंधळें आहे असें ह्मणाव-

शिवमेनमाहुरखिला वत्से सुमूढं जगत् ॥८८॥ न बंधुता यस्य हितोपदेशिनी न चान्वये यत्र पिता प्रतीयते ॥ यथेष्टचारी सुभगे तव प्रियः कुतोऽस्य सत्संगभवा विनीतता ॥८९॥ गद्यम् ॥ अलमधुना पापकथाप्रसंग इति वदति विगतवात्सल्ये कर्णशल्यानि वचनानि पितरि नितरां पतिगुणगर्हणरोषावेशपरुषारुणलोचना त्रिलोचनतुलोचना तं पुनरेवमवादीत् अये दक्ष शुभलक्षण कुतस्त्वयेऽयं पुण्यवासना समार्जिता यदिदानीं निर्मलनिरंकुशमंगलगुणरत्नाकरतया परशिवनामधेये महादेवे दिनकर इव तिमिररेखां दूषणकलंककलामारोपयसि तदयं धर्मस्य परिपाकः विवेकपरिणतिर्वा यदिवोपशांतेरुपयोगः भक्तिसरणेर्वा प्रकारांतरं मुमुक्षाया वा मूलबीजक्षेपः श्रुतस्य वा सूक्ष्मार्थदर्शनं यदि वा विद्यानां वा वैशद्यं अथवा गुरूपदेशस्य गृहीतार्थता सर्गस्य समवावतारणमार्गो वा किंवा कृतस्य दुष्कृतस्य नि-

---

याला हरकत नाहीं. (८९) या तुझ्या नवऱ्याला हितोपदेश करणारे बांधव घरीं आहेत ह्मणावें तर तेंही नाहीं, याच्या वंशांत बाप ह्मणून शब्दच नाहीं, अर्थात मनास वाटेल त्याप्रमाणें भटकतो झालें मग सज्जनांचा सहवास घडून विनयगुण याच्या ठिकाणीं कसा यावा? (९०) पुरें पुरें आतां अशा पाप्याची गोष्ट सांगण्यांत वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. याप्रमाणें आपल्या प्रेमापासून दूर राहिलेला तो दक्ष बोलत असतां त्याचीं तीं भाषणें सतीचीं मर्में तोडावयास लागलीं. याप्रमाणें पतीची निंदा ऐकून संतापानें तिचे डोळे लालभडक झाले. मग ती सती पुनः त्या दक्षाला ह्मणाली. हे शुभलक्षणा, दक्षा, अशी ही वासना तुला कोठून उत्पन्न झाली बरें? ज्याअर्थीं सांप्रत निर्मल प्रतिबंधरहित गुणांचा समुद्र आहे, ह्मणून ज्याला परशिव असें नांव आलेलें आहे, अशा त्या महादेवाच्या ठिकाणीं, सूर्याच्या ठिकाणीं अंधाराची कल्पना केल्याप्रमाणें काय दोषारोप करतोस? ह्मणूनच मला वाटतें कीं, धर्माला परिणामावस्था प्राप्त झाली आहे. किंवा विवेक परिपूर्ण अवस्थेला आला आहे काय? अथवा उपशांतीचा हा उपयोग ह्मणावा? किंवा दुसऱ्या तऱ्हेची भक्ति ह्मणावी? किंवा मोक्षाच्या इच्छेचें बीं पेरिलें? किंवा बहुश्रुतपणामुळें सूक्ष्मार्थ पाहणें? किंवा विद्येचें निर्मलत्व? किंवा गुरूपदेशामुळें स्वीकारिलेला अर्थ आहे? किंवा सृष्टीचा उतरता काळ आहे? किंवा केलेल्या पुण्यपापकर्मांचें फळ आहे? किंवा आरंभ केलेल्या यज्ञाचें पहिलें अंग आहे; किंवा

ष्कृतिविशेषः यद्वा प्रारंभितस्य महाक्रतोः प्रथमांगं तपःसंचयस्य वा सारः प्राजापत्यस्य वा प्रयोजनं यस्य बिभेति न महादेवनिंदामावहसि किमेते धूर्तवादा वेदाः परिहासः किमितिहासः किमपस्मृतयः स्मृतयः पुरुषवंचनावचनानि किं पुराणवचनानि अथवा दृषदः किमुपनिषदः मृषोद्याः किं सर्वदर्शनविद्याः यदि महादेवो मम पतिः सर्वेश्वरः सर्वमंगलावनः सर्वक्रतुसमाराध्यः सर्वोत्तरो न भवति यदि प्रमाणस्थानानि तदा पशुपतेरधिकं न देवतांतरं तद्गणनिंदा च ते नानंदाय भवति शृणु बहुश्रुत ॥ पद्यम् ॥ पद्मासनप्रभृतयः पशवः प्रसिद्धास्तेषां स्वतः पतिरसौ शिव एक एव ॥ द्वेषं समावहति चेत्पशुरेष तस्मिन्स्वामिद्रुहोऽस्य सुलभा सुगतिः कथं वा ॥९०॥ ब्रह्मादिकस्य जगतो मरुतां गणस्य विश्वाधिकः सुमनसामवसानभूमिः ॥ यस्मै नमस्यति शिवस्तनुते स्तुतिं वा तं पूरुषं शशविषाणमुदाहरंति ॥९१॥ यस्मिन्ननन्यविषया परमेश्वराख्या मुख्या यतः प्रथमतः स हिरण्यग-

---

तपश्चर्येचा सार ह्मणावा? किंवा केलेल्या प्राजापत्य यागाचें फळ आहे? ह्मणूनच कांहींएक न भितां यथेच्छपणें महादेवाची निंदा करतोस. माझा पति महादेव सर्वेश्वर, सर्वांचें पोषण करणारा, व सर्व यज्ञामध्यें आराधना करावयास योग्य? सर्वांपेक्षां श्रेष्ठ, असा नसेल ह्मणूनच वेद उन्मत्तपणें बोलूं लागलेत काय? इतिहास सर्व थट्टेच्या गोष्टी सांगूं लागले काय? स्मृति सर्व अपलाप करूं लागल्या काय? पुराणांतील वचनें सर्व फसवूं पाहतात काय? उपनिषदें सर्व दगडाप्रमाणें बसलीं आहेत काय? वेदांताविद्या सर्व खोटें बोलूं लागल्या काय? छे तसें नाहीं, ज्याअर्थी हजारों प्रमाणवचनें आहेत, त्याअर्थी माझ्या महादेवापेक्षां श्रेष्ठ दैवत दुसरें कोणतेंही नाहीं. ह्मणूनच त्या दैवताची निंदा तुझ्या कल्याणाकरितां होणार नाहीं हें समजून रहा. हे बहुश्रुता दक्षा, ऐक. ब्रह्मदेव वगैरे सर्व प्राणी, पशु असून त्यांचा पति साक्षात शिव एकटाच आहे. तशा पशुपतीच्या ठिकाणीं ज्याअर्थी तूं द्वेष करतोस, त्याअर्थी स्वामिद्रोह करणाऱ्या पशु अशा तुला चांगली गति सुलभपणें कशी मिळेल? (९१) जगांतील ब्रह्मादि सर्व देवांमध्यें व सर्व जगांमध्यें श्रेष्ठ वस्तु पराशिवच आहे. देवांची शेवटची हद्द ह्मणजे शिवच होय. तसा तो शिव ज्या देवतेला नमस्कार करतो, किंवा ज्याची स्तुति करतो, तें दैवत ह्मणजे सशाचें शिंग होय. (९२) परमेश्वर हें नांव मुख्यत्वेंकरून श्रीशिवाला सोडून इतराच्या ठिकाणीं मुळींच नाहीं. त्याच्या नंतर हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं

भिः ॥ विश्वाधिकं तमभिधेयतया निरुंधे ब्रह्मेति शब्द इति वेदविदो वदंति ॥९२॥ स गर्वितो यो न नमेत्समागतं गणाधिकत्वात्प्रथमानुलेपनम् ॥ निरस्तसाम्यातिशयो महेश्वरो न कंचिदन्यं नमतीति गौरवात् ॥९३॥ श्मशानमेतद्भुवनं चराचरं शिवेन दग्धे नयनाग्निनावधौ ॥ स केवलोऽस्मिन्वसतीति गीयते श्मशानवासीति किमत्र दूषणम् ॥९४॥ विधेर्विधाता सकलप्रजायुषो निदर्शनं दीर्घतरायुषामपि ॥ करोटिकां तस्य करे दधाति यः स कालकालः कथमेष दूष्यते ॥९५॥ सर्वज्ञः परमेश्वरः पशुपतिः शंभुर्महादेवता श्रीकण्ठो मृड ईश इत्यनितरालंबैर्निजैर्नामभिः ॥ प्रख्याताममलसर्वमंगलगुणं नित्यप्रकाशं शिवं प्राहुस्तामस इत्यहो जडधियः कः सात्विको दृश्यते ॥९६॥ यद्देवतागौरपि हव्यसंपत्सोमाहुतिर्यद्विषया प्रसिद्धा ॥ यस्येच्छयोपाकरणं पशूनां म-

---

ब्रह्म हा शब्द गौणपणें आला आहे असें मोठमोठे वेदवेत्ते लोक सांगतात. (९३) हे दक्षा, तसा पशुपतीनें गर्विष्ठपणानें तुला नमस्कार केला नाहीं असें तूं समजूं नकोस. परंतु सर्व देवगणांमध्यें श्रेष्ठ असल्यामुळें व सर्वांपेक्षां पहिला मान त्याचा असल्यामुळें त्या शिवाच्या बरोबरीचा दुसरा कोणी नसल्यामुळें तो महेश्वर आपल्या गौरवानें दुसऱ्या आलेल्या कोणत्याही प्राण्याला नमस्कार करीत नाहीं. (९४) महाश्मशानांत नेहमीं तो राहतो ह्मणून तुझें ह्मणणें आहे, त्याला उत्तर देतें ऐक. भालनेत्रांतील अग्नीनें सर्व जग जळून गेल्यानंतर सर्व जगाची राखरांगोळी होऊन श्मशानभूमीप्रमाणेंच होतें अशा या ठिकाणीं तो एकटाच फिरतो, ह्मणून त्याला श्मशानवासी ह्मणतात, यांत दोष कोणता आहे सांग. (९५) कपालधारण करतो ह्मणून तुझें ह्मणणें आहे त्याला उत्तर देतें ऐक. ब्रह्मदेवाचा तो पोषक असून सर्वांपेक्षां दीर्घायुषी कोण असतील त्यांच्या आयुष्याचें निदर्शन दाखविण्याकरितां त्या ब्रह्मदेवाचें कपाल त्यानें हातांत धरिलें आहे, ह्मणून तुझ्यासारख्या पामरानें त्याचें दूषण करावें कीं काय? (९६) सर्वज्ञ, परमेश्वर, पशुपति, शंभु, महादेव, श्रीकंठ, मृड, ईश, वगैरे नांवें त्यालाच असून हीं नांवें दुसऱ्याला मुळींच नाहींत, अशा या नांवांनीं त्याचे मंगलकर गुण जगांत प्रसिद्ध असून त्या नित्यप्रकाश परशिवाला तामस असें विशेषण देतोस, अशा जडबुद्धीच्या तुला जगांत सात्विक दिसतो तरी कोण? (९७) हव्यरूप संपत्तीनें युक्त असलेल्या गायीचें मुख्य दैवत शिवच असून सोमाहुति शिवाचीच आहे, असें जगांत प्रसिद्ध आहे. ज्या शिवाच्या इच्छेनेंच यज्ञाचें साधन पशु झाले आहेत

खेष्वमान्यः स कथं महेश्वरः ॥९७॥ कुक्षौ रतिर्देवगणे कुतस्ते रुद्रे श्रुतेऽप्यध्वरराजनाम्ना ॥ आज्ञाप्रयुक्तैरलमत्र वाद्यैर्यज्ञे तमेकं यज दक्ष साक्षात् ॥९८॥ यज्ञान्वितः सन् बहुदक्षिणांशा यस्याष्टमी मूर्तिरिति प्रतीतः ॥ तं दक्ष यं दूषयतोऽद्य यज्वन्नात्मैव ते दूष्यदशामुपैति ॥९९॥ शंभोः संपर्कमात्रेण त्याज्यां मां भाषते भवान् ॥ दक्ष दीक्षित तन्मूर्तेस्तव केन विशुद्धता ॥१००॥ गद्यम् ॥ किमत्र बहुभाषितेन वज्रकपाटिका सुरभवनद्वारस्य कामधेनुर्नारकमहाराज्यप्रदानस्य कुलिशधारा सुकृतगिरिकूटस्य प्रलयघनघटा विपदशनिपातस्य कुठारकोटिः कुशलपादपस्य दवशिखिशिखा वंशपरंपरायाः प्रचंडवात्या प्रणयदीपस्य आकर्षणदेवताऽनर्थसंपदां उच्चाटकमंत्रगुळिका मंगलानां हिमानी विद्याकमलिनीनां प्राणसखी महापातकानां तपःसिद्धिर्वैदिकानां

---

असें असून यज्ञामध्यें तो श्रीशिव मान्य नाहीं काय? (९८) इतर देवगणांची आराधना या यज्ञांत करशील तर तुला त्यांपासून तरी सुख कसें मिळेल? कारण अध्वरांचा मुख्य राजा श्रीशिवच प्रसिद्ध आहे. याकरितां ज्या देवतेच्या आराधनेबद्दल वाद्य वाजविण्याविषयीं आज्ञा केली आहे, ती मोडून श्रीशिवाची आराधना करण्याबद्दल आज्ञा सोड. (९९) हे दक्षा, यज्ञ करावयाकरितां जो उद्योग आरंभिला आहे. या यज्ञांतील दक्षिणेचा अंश साक्षात श्रीशिवाची आठवी मूर्ति असून त्याची तूं निंदा करतोस, यावरून तुझ्या आत्म्याचें दूषण तूंच आपण होऊन केल्याप्रमाणें होतें याचा विचार कर. (१००) श्रीशिवाचा सहवास मला घडला ह्मणून तुला मी त्याज्य झाल्यें, पण दीक्षा घेऊन बसलेल्या दक्षा, तुझी ही मूर्ति ( शरीर ) कशानें शुद्ध झाली आहे सांग. (१०१) तुझ्याशीं फार बोलून काय करावयाचें आहे? हे दक्षा, शिवनिंदा जगांत कोणाला कल्याणदायक झालेली आहे बरें? शिवनिंदा केल्याबरोबर स्वर्गाचीं कवाडें वज्रमय होतात, नरकांतील साम्राज्य, द्यावयास कामधेनूप्रमाणें शिवनिंदा पुढें पुढें येऊन उभी राहत आहे, पुण्यरूप पर्वताला वज्राच्या धारेप्रमाणें होते, विपत्तिरूप वीज कडाडल्याबरोबर प्रलयांतील मेघाप्रमाणें शिवनिंदा सिद्ध होऊन राहत आहे, कुशलरूप झाडाला कुऱ्हाडीची धार होते, वंशरूप वेळूच्या वनाला दावाग्नीच्या ज्वाळेप्रमाणें होते, स्नेहरूप दिव्याला सोसाट्याच्या वाऱ्याचें रूप घेते, शिवनिंदेनें अनर्थ अतोनात कोसळतात, शिवनिंदेनें मंगल कधींही राहत नाहीं, थंडीनें कमळ नाहींसें झाल्याप्रमाणें शिवनिंदेनें विद्या नाहींशी होते, शिवनिंदेनें महापातकें घडून येतात, वैदिककर्मे सर्व

श्रवणशल्यशलाका सात्विकानां प्रलयपात्रं पाषंडानां कंदली दुर्यशःकं-दलानां प्रथमसंततिरविवेकस्य महोत्पातः कृतकालोकस्य महामारी श्रोतॄणां शिवदूषणकथा शिवंकरी भवति केषाम् ॥ पद्यम् ॥ गंगादिष्ववगाहनेन तपसा कृच्छ्रोपवासादिना वेदानां परिशीलनेन विधिना यज्ञस्य दानेन वा ॥ प्रायश्चित्तविधानमस्ति बहुधा शास्त्रे महापापिनामालोके शिवदूषणस्य न कुतोऽप्यल्पस्य वा निष्कृतिः ॥१०१॥ यावान्ब्राह्मणनिंदया युगशतं दोषः समुत्पद्यते तावन्मासकृतैर्निरंतरतया वेदापवादैर्भवेत् ॥ प्रारब्धे शिवदूषणे क्षणमपि प्रायेण सर्वात्मनां तस्मादप्यधिकं सहस्रगुणितं संजायते पातकम् ॥१०२॥ अवधिर्जलधिर्वसुंधराया ध्रुवसीमा चरमाचलं सुमेरोः ॥ अमिमीत पुरा हरिस्त्रिलोकीं शिवनिंदादुरितस्य नावसानम् ॥१०३॥ शिवदूषणजस्य पापराशेः शिवनामस्तुतिरेव शांतिहेतुः ॥ न तपो न मखो न दानभेदा न पुनः सांतपनादयोऽपि कृच्छ्राः ॥१०४॥ जिव्हां पुनीहि तात त्वं शिवनिं-

---

लोपून जातात, सात्विकांचा मर्मभेद करिते, पाषंडपणा जास्त वाढतो, अपकीर्ति जास्त होत्ये, केव्हांही अविवेक पुढें येऊन राहतो, केलेल्या उपकाराची आठवण होत नाहीं, ऐकणाऱ्याला महामारीप्रमाणें वाटतें, असें असून जगांत शिवनिंदा कोणाचें कल्याण करील? महापातकी लोकांचें दर्शन झालें तर गंगादि नद्यांमध्यें स्नान केलें तर मनुष्य शुद्ध होईल, किंवा तपानें शुद्ध होईल. कृच्छ्रोपवासादि नियमांनीं शुद्ध होईल, किंवा वेदाचा अभ्यास केल्यानें शुद्ध होईल, विधिपूर्वक यज्ञ केले तर दानें केलीं तर शुद्ध होईल, परंतु कांहींतरी प्रायश्चित्त शास्त्रांत याविषयीं आढळेल, पण शिवदूषणाला प्रायश्चित्त जगांत कोठेंही आढळावयाचें नाहीं. (१०२) शेंकडो युगापर्यंत ब्राह्मणांची निंदा केली तर काय दोष येतो, तो दोष तितक्या महिन्यांनीं वेदांची निंदा निरंतर केली तर दोष येतो, परंतु एक क्षणमात्र बसून शिवनिंदा केली तर सर्व पातकांपेक्षां हजारो पटीनें जास्त पातक लागतें. (१०३) पृथ्वीला हद्द समुद्र आहेत असें ठरलें आहे, ध्रुवाची हद्द मेरूच्या पलीकडचा शेवटचा पर्वत ह्मणून ठरलेला आहे, श्रीहरीनें त्रैलोक्याचें देखील माप घेतलें पण शिवनिंदेच्या पातकाची हद्द मात्र कोणाला लागली नाहीं. (१०४) शिवनिंदेनें प्राप्त झालेल्या पापराशीला प्रायश्चित्त ह्मणजे शिवनामाची स्तुति करणें हेंच होय. याला प्रायश्चित्त ह्मणजे तप नाहीं यज्ञ नाहीं दानें नाहींत, पुनः सांतपनादिकृच्छ्रें नाहींत. (१०५) याकरितां हे ताता, शिव-

दारजस्वलाम् ॥ शिवस्यैव गुणाशंसातीर्थसंततधारया ॥१०५॥ गद्यम् ॥ इति परमहितोपदेशामृतधारावर्षिण्यामपि कात्यायनीकादंविन्यां कथंचिदपि दक्षस्य चेतोभुवि न शशाम द्वेषरजः स तां पुनरभिजातविनयां तनयां प्रत्येवमवादीत् ॥ पद्यम् ॥ एते ममैकादश संति रुद्रा एभ्यः परं किंचिदहं न जाने ॥ यज्ञेष्वमूनेव भजामि वत्से ददामि ते भर्तुरहं न भागम् ॥१०६॥ भज रुषमथवा प्रसीद बाले भवतु शुभाशुभपर्वणोरिहैकम् ॥ पशुपतिगुणदूषणप्रतिज्ञापटहरवो मम विश्रमं न धत्ते ॥१०७॥ इति दृढतरशिवदूषणप्रतिज्ञारूक्षे दक्षे जनक इति दुर्वारिते शर्वाणी सभासदः समालोक्य सदोषलक्षणमिदमाचचक्षे सर्वस्य दूषणदं द्रुह्यमाने सदसीह मुनयो मुद्रितगिरः प्रवसंति श्रुतयोऽपि जोषमासते भो भो यज्ञांशभाजः ईश्वरावज्ञा भवद्भिरनु-

---

निंदेनें दूषित झालेल्या तुझ्या जिभेला पवित्र कर. त्या तुझ्या जिभेला पवित्र करावयाचें झालें तर शिवगुणाच्या संतत प्रशंसारूप तीर्थधारेनें पवित्र करावें लागतें. (१०६) अमृताच्या संतत धारेची जशी वृष्टि करावी, त्याप्रमाणें कात्यायनीरूप मेघमालेनें हितोपदेशरूप अमृताची वृष्टि वाटेल तितकी केली तरी दक्षप्रजापतीच्या मनोरूप जमिनीवरचे द्वेषरज कांहीं खालीं बसले नाहींत. नंतर परमविनयगुणांनीं युक्त अशा आपल्या कन्येला तो दक्ष ह्मणाला. हे कन्ये, मला हे एकादश रुद्र आहेत, यांच्याशिवाय दुसऱ्या रुद्राला मी जाणीत नाहीं. माझ्या यज्ञामध्यें यानांच मी भाग देतों, तुझ्या नवऱ्याला देत नाहीं. (१०७) बाळे दाक्षायणि, माझ्यावर तूं राग कर किंवा लोभ ठेव, व मला शुभ होवो, किंवा अशुभ होवो, पशुपतीची निंदा करण्याकरितां नगारा वाजविण्यास एकदां जी आज्ञा केली आहे ती कांहीं आतां परत घेत नाहीं. (१०८) याप्रमाणें शिवनिंदेविषयीं दृढ प्रतिज्ञा केलेली पाहून वाटेल तें केलें तरी आपला बाप दक्ष हा कांहीं परत घेत नाहीं, असें जाणून शर्वपत्नी श्रीअंबिकेनें सभासदांकडे पाहून संतापानें ह्मटलें. सर्व जगाला दोष ठेवणारा ( सर्व जग दोषी असून ) व आपण स्वतः निर्दोष असलेल्या महादेवाची निंदा दक्ष हा करीत असतां या सभेमध्यें असलेले सर्व ऋषि तोंड झांकून स्वस्थ बसतात, ह्मणजे आश्चर्य नव्हे काय ? श्रुति तर मौन धरून स्वस्थ बसल्या आहेत, अहो, यज्ञांतील भाग घेणारे देवहो, ईश्वराचा अपमान होतो तो तुह्मांला मान्य

ज्ञायते प्रसूतिरपि मनोः प्रसूतिरंवा कथमिव मौनमवलंवते या कर्तुः कर्मफलभागिनी श्रृण्वंतु सर्वेऽपि सभासदः ॥ पद्यम् ॥ वेदापवादशिवदूषणविप्रनिंदागोष्ठीषु यो वितनुते गुरुगर्हणं च ॥ जिव्हाग्रघट्टनपुरःसरदंडपातैः सद्यः स शास्य इति वेदविदो वदंति ॥१०८॥ जिव्हां प्रसह्य दलयेच्छिवदूषणानां कर्तुः शिरोप्यतिहरेत्ककचेन शक्तः ॥ अन्यो व्रजेदपरतश्च पिधाय कर्णौ मुंचेदसुं नियम एष विमुक्तिपंथा- ॥१०९॥ गद्यम् ॥ किमनेन मम भर्तुर्महादेवस्य दूषणमहापातकेन उपहितात्मना तातेन जनन्या बंधुतया वा तदेतत्संवंधदूषितां तनुमपहाय श्लिष्टयोनिमेलनोत्कष्टामन्यां मूर्तिमाश्रित्यावश्यं पशुपतिसेवामनुपास्यामीत्यभिधाय सा भगवती योगसमाधिमधिरूढवती तत्रांतरे॥ पद्यम् ॥ पश्यतां हि दिविषत्सभासदां विश्वतो नयनविस्मयावहम् ॥ चंडभानुपरिभावितत्तनोर्मंडलं किमपि तेजसा ह्यभूत् ॥११०॥ योगिने शिखिनि सा हुताकृतिर्योगिनी सपदि योगमायया ॥ मेनकां हिमगिरेः

---

आहे काय? साक्षात स्मृतिकर्त्या स्वायंभुमनूची आई प्रसूति देखील मौन धरून कशी स्वस्थ बसली? कारण ती प्रसूति यज्ञ कर्त्यांचें फल भोगणारी आहे ना? सभासदहो, ऐका ऐका. वेदनिंदा, शिवनिंदा, ब्राह्मणनिंदा, गुरुनिंदा यांविषयीं जो संमति देतो, त्याची जीभ तोडून तोडून व हजारो तऱ्हेच्या दंडांनीं (काठ्यांनीं) मार मारून त्याला शासन करावें, असें वेदवेत्ते लोक सांगतात, (१०९) शिवनिंदा जो करतो, त्याच्या जिभेचे तुकडे तुकडे करावे, किंवा त्याचें डोकें करवतीनें कापून काढावें, इतकें करावयास असमर्थ असेल तर त्यानें आपले दोन्ही कान झांकून दुसरीकडे निघून जावें. किंवा आपले प्राण तरी तत्काळ सोडून टाकावेत हा मुक्तिमार्ग आहे, असें सांगतात. (११०) माझा पति अशा श्रीशिवाची निंदा करणाऱ्या महापातकी या बापाला घेऊन मला काय करावयाचें आहे; व अशा आईला व बांधवांना घेऊन काय करावयाचें आहे? याकरितां अशा आईबापांच्या संवंधानें दूषित झालेलें हें शरीर सोडून योनीपासून जन्म घेण्यापेक्षां इतर श्रेष्ठ जन्म घेऊन त्या शरीरानें पशुपतीची सेवा करितें, असा निश्चय करून याप्रमाणें सर्वांस सांगून तिनें योगाला सुरवात करून समाधि लाविली. इतक्यांत सभेंतील सर्व देव पाहत असतां चोहोंकडे डोळ्याला आश्चर्यकर दिसणारें तिचें शरीर प्रचंड सूर्यासारखें अतिशय तेजस्वी दिसलें. (१११) योगिनी अशा त्या भवानीनें योगमार्गानें प्रादुर्भूत झालेल्या अग्नींत योगी अशा

कुटुंबिनीं संभवाय भवभामिनी ययौ ॥१११॥ तस्यां गतायामपि वि-श्वधात्र्यां दक्षो न किंचिन्मनसा चचाल ॥ विनिंद्य तं वेदविदो मुनीं-द्राः सद्यः पलायंत समात्तरोषाः ॥११२॥ सर्वत्रापि चचाल भूस्तत इतः सप्तार्णवाश्चुक्षुभुश्चंडांशुर्मलिनो बभूव सहसा चंडो ववौ मारुतः॥ मेघाः शोणितवर्षिणः समभवन्नासन् दिशः पांसुलाः सर्वेणापि शुभे-तरम् प्रकटितं तस्यां पुनस्तादृशि ॥११३॥ गद्यम् ॥ तत्रांतरे सपदि तदनुचरवर्गो भर्गमुपसृत्य प्रणम्य च सकलं देव्या वृत्तांतमचोदयत् तदाकर्णनसमुदितरोषलेशस्य महेश्वरस्य मुकुलितघर्मजलबिंदुदंतु-रितमभून्मुखमंडलम्॥ पद्यम् ॥आदाय पाणिनखरांचलधारयाऽसौ घ-र्मांबुबिंदुशकलं घटितं ललाटे ॥ भूमौ मुमोच भगवान् भुवनात्मसा-क्षी वीरो महानभवदार इवाशु तस्मात् ॥११४॥ स्वल्पावशेषकवलीकृ-तचंद्रबिंबः स्वर्भानुविभ्रमभृता परिशोभमानः ॥ दंष्ट्राकरालशुचिना मुखमंडलेन दिव्यायुधप्रकरदीपितबाहुदंडः ॥११५॥ तं वीरभद्रमव

---

श्रीशिवाकरितां आपल्या शरीराची आहुति दिली, हिमालयाची बायको मेनका हिच्या पोटीं जन्म घेण्याकरितां ती शिवपत्नी निघून गेली. (११२) ती सती या-प्रमाणें निघून गेल्यानंतर दक्षाचें मन थोडें देखील हाललें नाहीं. नंतर वेदवेत्ते मोठमोठे ऋषि त्या दक्षाची निंदा करून संतापानें तेथून पळून गेले. (११३) नंतर जमीन चोहोंकडे हदरूं लागली, सप्तसमुद्र खवळून वर येऊं लागले, सूर्य काळा पडूं लागला, वारा प्रचंडपणें वाहूं लागला, आभाळांतून रक्ताची वृष्टि पडूं लागली, दिशा सर्व धुरकट दिसूं लागल्या, ती दक्षकन्या नाहींशी झाल्याबरोबर चोहोंकडून असे उत्पात होऊं लागले. (११४) इतक्यांत तिच्या सेवकजनांनीं पुनः परत कैलासाला येऊन श्रीशिवाला नमस्कार करून देवीची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकल्याबरोबर श्रीशिवाला जो थोडा बहुत राग आला, त्यामुळें श्रीशिवाच्या कपाळावरून घामाचे बिंदु पडावयास लागले. कपाळावर जो घाम सांचून राहिला होता तो आपल्या हातानें काढून जमिनीवर फेकून दिला. लोकसाक्षी शिवाच्या त्या घामापासून मोठा पराक्रमी वीरभद्र जन्मला, त्याला पाहिल्याबरोबर नवग्रहांतल्या मंगळाला पाहिल्याप्रमाणें वाटत होतें.(११५) थोडें सोडून संपूर्ण चंद्रबिंब ग्रासणारा राहु जसा दिसावा, त्याप्रमाणें भयंकर दा-ढांनीं युक्त त्या वीरभद्राचें मुख दिसत होतें, हातांत दिव्य दिव्य आयुधें त्यानें घेतलीं होतीं, त्यामुळें तो विशेष शोभत होता. (११६) नंतर अशा वीरभद्रानें

लोक्य कृतप्रणामं क्षुद्रेतरेण वपुषा कुलशैलकल्पम् ॥ कर्तव्यताश्रवण-कौतुकमादरेण कालांतको बलजितांतकमादिदेश ॥११६॥ यस्यानादरतो मम प्रियतमा याता शरीरांतरं यः कुर्वन् मम दूषणानि जयते सर्वत्र कुस्वामिनः ॥ दक्षं दीक्षितमृत्विजं सह गणैस्तं ताडयित्वांजसा देवान् शिक्षय हव्यभक्षणपरा ये तस्य साक्षात्कृताः ॥११७॥ गद्यम् ॥ इति महतो देवस्य योगमधिगम्य निजरोमकूपनिर्धूननिर्मितनिर्मर्यादपरिवारपरःशतपरिगतमहारौद्रः स वीरभद्रः सपदि तदीयं यज्ञवाटनिकटं उपागमत् तत्र स दुर्वारपरिवारगर्वोक्तिश्रवणपुटकटुतरदंभोलिनिनदाडंबरमंबरविवरनिपुणसंनाहं सिंहनादमकरोत् घट इव मेदिनीसंधिः पपातेव सर्वतः सर्वपर्वतगणः विसस्राव बहुधा वधूनां गर्भपेशी मुमुहुरतितरां ऋत्विजो मुनयः तत्रासीनः सुत्रामपूर्वः सुरगणो धीरधीरः स दक्षो न तमलक्षयत् ततः स महावीरो

---

श्रीशिवाला नमस्कार केला, मोठ्या धिप्पाड शरीरानें पर्वताप्रमाणें दिसणाऱ्या त्या वीरभद्राला पाहून आदरपूर्वक आपलें कर्तव्य बजावण्यास सिद्ध असलेल्या इंद्राच्या अंतकाला ( वीरभद्राला ) कालांतकानें ( शिवानें ) आज्ञा केली. (११७) भो वीरभद्रा, ज्यानें अनादर केल्यामुळें माझी प्रिय बायको आपलें शरीर सोडून दुसरा जन्म घ्यावयास गेली, व जो माझें दूषण करून आपला जयजयकार करून घेतो, असा दुष्ट प्रभु दीक्षित अशा दक्षाला व त्याच्या ऋत्विजांला यथेच्छ चोप देऊन नंतर त्या यज्ञांत हव्य भक्षण करण्याच्या आशेनें प्रत्यक्ष स्वरूपानें आलेल्या सर्व देवांना शासन कर. (११८) याप्रमाणें महादेवानें आज्ञा केलेली ऐकून वीरभद्रानें आपल्या आंगावरचे रोम झाडले, त्यासरशीं त्या रोमांपासून शेंकडो हजारो त्याच्याच आकृतीचा अनंत परिवारगण निघाला त्या परिवाराला घेऊन तात्काळ दक्षाच्या यज्ञशाळेला तो वीरभद्र गेला. त्याठिकाणीं महासमर्थ असे ते वीरभद्राचे अनुचर कर्णकठोर सिंहनाद करूं लागले नंतर वीरभद्रानेंही कोट्यावधि विजा कडाडल्याप्रमाणें सिंहनाद केला त्यामुळें आकाशाचें छिद्र भरून गेलें. वरून पडून फुटलेल्या मातीच्या घागरीप्रमाणें पृथ्वी वरून पडली कीं काय ह्मणूनच तिचे सांधे सर्व ढिले पडून चोहोंकडून डोंगर गळूं लागले ( कोसळून पडूं लागले ), प्रायशः तेथल्या स्त्रियांचा गर्भपात होऊं लागला. तेथें ऋत्विज, मुनि, वगैरे मूर्छा येऊन पडले. इंद्रादिदेवांचें धैर्य खचून गेलें इकडे

बलादेव विलावकाशाम् यागशालां प्राविशत् ॥ पद्यम् ॥ वीरभद्रमवलोक्य ते भवन्विद्रुता दिविषदः सभासदः ॥ सिंहराजमविषह्य रंहसा वारणा वनपरायणा इव ॥११८॥ उद्धतायुधमुपस्थितं पुरो वीरभद्रमुपनिद्रतेजसम् ॥ लक्षकोटिपरिवारलक्षितं दक्ष एवमवदत्स दीक्षितः ॥११९॥ को वा भवान् कुत इहागतवान् हि भूयो माभूत्क्रतोरुपहतिर्महता बलेन ॥ ये के भवादृशमनादृतधर्ममार्गं शापाग्निना मुनिवराः सहसा दहेयुः ॥१२०॥ इति गदितवति स विरूपाक्षोऽपि तमेवाचचक्षे । सोऽहं शंकरकिंकरो जडमते यज्ञे मम स्वामिनो भागं कल्पय संशयोऽस्ति यदि वा द्रष्टव्य एवागमः ॥ यद्वाचास्ति बलात्कृतिर्भवति चेत्किंवा बलस्यास्पदं देवा वा मुनयोऽथ वा निजतपः सर्वं विविच्योच्यताम् ॥१२१॥ इति तमभिहितवंतं स पुनरब्रवीत् ॥ पद्यम् ॥ वदंतु वेदा यदि वा तथा परे मखेषु रुद्रं न वयं यजामहे ॥ इमां प्रतिज्ञां

---

त्या दक्षानें लक्षच दिलें नाहीं. नंतर महावीर वीरभद्रानें लहानशा विळाप्रमाणें वाटत असलेल्या यज्ञशाळेंत बळजबरीनें प्रवेश केला. सिंहराजाला पाहून अतिशय वेगानें हत्ती जसे रानोमाळ भटकत सुटावेत, त्याप्रमाणें वीरभद्राला पाहून यज्ञशाळेच्या सभेंतील सर्व सभासद देव जिकडे तिकडे पळून गेले. (११९) हातांत आयुधें उचलून धरलेला, लक्षावधि कोट्यावधि परिवारासह आलेला, आपल्यापुढें उभा असलेला, महातेजस्वी असलेला, अशा वीरभद्राला दक्ष ह्मणाला. (१२०) अरे, तूं कोण आहेस ? कोठून आलास ? तूं आपल्या मोठ्या बळानें या यज्ञाचा भंग करूं नकोस. धर्ममार्गाला अनादर करणाऱ्या तुझ्यासारख्या लोकांना मोठमोठे ऋषि शाप देऊन एकदम जाळून टाकतील. (१२१) याप्रमाणें सांगत असतांनाही तो वीरभद्र त्या दक्षाला ह्मणाला. हे जडबुद्धीच्या दक्षा, तो हा मी श्रीशंकराचा दास आहे, समजलास. या यज्ञांत माझ्या स्वामीला एक भाग काढून ठेव, याविषयीं संशय वाटत असेल तर आगम शोधून पहा. किंवा तसाच बलात्कारानें यज्ञ करशील तर तुला बळ कोणाचें आहे सांग. देव आहेत, मुनि आहेत, किंवा तुझें तप आहे यांपैकीं काय आहे, तें सर्व विवेचन करून सांग. (१२२) याप्रमाणें बोलणाऱ्या त्या वीरभद्राला दक्ष पुनः ह्मणाला. वेद सांगोत किंवा न सांगोत, दुसरे आगम सांगोत किंवा न सांगोत, आह्मी तर तुझ्या स्वामीला भाग देत नाहीं. या माझ्या प्रति-

मम येऽभ्यसूयिनो दहामि तानाशु तपोमयाग्निना॥१२२॥इति गर्वरूक्षे दक्षे त्र्यक्षगणाध्यक्षोऽपि पुनरेवमवोचत् ॥ पद्यम् ॥ रे रे दक्ष महेश्वरं न यजसे यज्ञेश्वरं दूषयन् वेदोक्तानवमत्य धर्मसमयान् विद्वज्जनैराद्दतान् ॥ त्वां यज्ञं च सहर्त्विजं च सहसा संहर्तुमीहामहे ब्रह्मा विष्णुरथापि ते सुरवरा रक्षंतु ये संमताः ॥१२३॥ तपोमयं दर्शय दक्ष पावकं सहायभूतैः सह तापसोत्तमैः ॥ ललाटनेत्रज्वलितेन वन्हिना दहामि ते संप्रति यज्ञवाटिकाम् ॥१२४॥ गद्यम् ॥ इति वदन्नेव शंकरकिंकरो निरंकुशगतिर्निजनिटिलनिर्यातममर्यादं वन्हिमन्हाय कूटकोटिषु ससंरंभमलंभयत् ततस्तदनुजलधरपारावतपटुतनुरुचिसाचिवो धूमनिचयो वियति मेघंकरः सकरः सकलभयकरो जनक इव त्रिवर्ग्यपावकस्य जिजृंभे च नभसि सपदि कवलितसकलाशो हुताशः । तत्रांतरे ॥ पद्यम्॥ हा नाथ क्वासि वन्हिः स्पृशति कचभरं नात्र पश्या-

---

झेला असूयेनें जे अडथळे आणतील त्या सर्वांना लौकरच माझ्या तपोबळानें जाळून टाकितों. (१२३) अशा गर्वाचें त्याचें बोलणें ऐकून वीरभद्र पुनः ह्मणाला. हे दक्षा. महेश्वराची आराधना न करशील तर व वेदोक्त मार्गाचा अनादर करून यज्ञेश्वर शिवाची निंदा करशील तर व धार्मिक विद्वानांनीं आदर केलेल्या मार्गाचें अवलंबन न करशील तर तात्काळ सर्व ऋत्विजांसह तुझा आणि तुझ्या यज्ञाचा नाश आह्मी करूं तर यावेळेस ब्रह्मा विष्णु वगैरे जे देव श्रेष्ठ तुला संमत असतील ते तुझें रक्षण करोत. (१२४) हे दक्षा, तुझें तप कोठें आहे तें दाखीव, आणि तपोमय असा तो अग्नि कोठें आहे दाखीव, तुला सहाय्य करणारे ते तापसश्रेष्ठ ऋषि कोठें आहेत दाखीव, या सर्वांना व तुझ्या या यज्ञशाळेला माझ्या कपाळावरच्या डोळ्यांतील अग्नीनें जाळून टाकितों, व तुलाही जाळून टाकितों. (१२५) याप्रमाणें बोलत बोलतच तो शंकराचा दास वीरभद्र हा मनास वाटेल त्या ठिकाणीं त्या यज्ञशाळेंत हिंडून आपल्या कपाळावरच्या डोळ्यांतला अपरंपार अग्नि प्रकट करून मोठ्या वेगानें जाळूं लागला. त्याला अनुसरून पाण्यानें गच्च भरलेल्या आभाळाप्रमाणें दिसणारा धुराचा लोट आकाशामध्यें पसरला, व दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आहवनीय या अग्नींचा जनक आहे कीं काय याप्रमाणें दिसणारा, सर्वांना भयंकर दिसणारा अग्नि तात्काळ आकाशामध्यें व दाही दिशांमध्यें पसरला. अशा वेळेस हा प्रभो कोठें आहांत, अग्नि जाळतो, माझी वेणी जळाली, माझा मुलगा कोठें दिसत नाहीं, हाय हाय बाबा, तुझ्या मुलीचें

मि पुत्रं हा तात त्राहि पुत्रीमनुसर दहनो लेढि वस्त्रांचलं मे ॥ हा मातर्देहि हस्तं कवलयति शिखी याहि पानीयशालामालीत्यावेगवार्ता ततिरजनि मिथो यज्ञशालांगनानाम् ॥१२५॥ ततस्तदाज्ञया प्रमथपरिवृढैः पर्यभावि महाक्रतुः ॥ पद्यम् ॥ शम्याग्निहोत्रहवनेषु पृषत्कपालकृष्णाजिनोपलवपाश्रयणी मदंतिः ॥ वेदं जुहूंस्त्रुवमृडामरणिं ध्रुवां च निष्पिष्य केचन गणा व्यकिरन् जलेषु ॥ गद्यम् ॥ सोमग्रहानादाय स्वमुखेषु केचन सोमाहुतिमजुहुवन् अन्ये वपामपरे पाकसुरभीन् पुरोडाशान् अपरे मान्यानि पशुमांसशकलानि अध्वर्युमावध्य कतिचिदिध्मानीति निरबध्नन् आब्रह्मणो ब्रह्मसूत्रमपरे समखंडयन् उद्गात्रश्मश्रुशिखे केचिदुत्पाटयन् होत्रगले केचिदुलूखलमाबध्य तमनर्तयन् ॥ ये के पुनरभावात् कमपि छागमेकरशनया संबध्य सर्वत्राप्यद्रावन् परे केचित्पाणिताडनया सुब्रह्मण्यमब्रह्मण्यप्रलापिनमकुर्वन्॥यूपमुत्पाट्य कतिचिन्नेतुराधिकंधरमवबंधयन् केचिक्रोष्टारमिव शु-

---

रक्षण कर, हा अग्नि माझा पदर जाळूं लागला, हाय हाय आई, तुझा हात माझ्या हातांत दे, हा अग्नि जाळतो, हे सखि पानीयशाळेला चल, अग्नि जाळूं लागला, असे दुःखकारक शब्द यज्ञशाळेंतील स्त्रिया काढूं लागल्या ( आक्रोश करूं लागल्या. ) (१२६) त्या वीरभद्राच्या आज्ञेनें प्रमथश्रेष्ठ त्या यज्ञाचा ध्वंस करूं लागले. त्या यज्ञामध्यें वृषत्कपाल, कृष्णाजिन, उपल, वपा, आश्रयणी, वेद, जुहु, स्त्रुव, मृडा, अरणी, ध्रुव, वगैरे पदार्थ घेऊन त्यांचें पीठ करून कांहीं गणांनीं पाण्यांत टाकून दिलें. कांहीं लोक सोमग्रह घेऊन आपल्याच मुखांत सोमाहुति घालूं लागले. कांहीं लोक वपा खाऊं लागले, कांहीं लोक सुगंध पुरोडाश खाऊं लागले. इतर कांहीं लोक पशूच्या मांसाचे तुकडे खाऊं लागले. कांहीं लोक तेथल्या अध्वर्यूंना इध्मांप्रमाणें (लांकडाच्या भाऱ्याप्रमाणें ) बांधूं लागले कांहीं लोक ब्राह्मणांच्या गळ्यांतील यज्ञोपवीत तोडूं लागले कांहीं लोक उद्गाताच्या मिशा आणि शिखा काढूं लागले, कांहीं लोक होत्याच्या ( हवन करणाराच्या) गळ्यांत उखळ बांधून नाचवूं लागले, कांहीं कोणा एका बकऱ्याला धरून एकाच दोरीनें बांधून चोहोंकडे पळवूं लागले. कांहीं लोक हातानें मार देऊन ब्राह्मणांचें ब्राह्मण्य ( ब्राह्मणपणा ) घालवूं लागले ( बाटवूं लागले ) यज्ञांतील खांब उपटून नेत्याच्या गळ्यांत बांधूं लागले. कांहीं लोक अरणीची रवी

नका यष्टारं निर्ववंधुः अन्ये पुनररणिमंथानदारुणा (मंद्रेण) दस्युमिव सदस्यम् (सदःसं) ववंधुः एवमन्येऽपि केचन यज्ञसंबंधिनस्तेऽपि सर्वे पर्यभाषत प्रमथयूथपैः ॥ इति विहितमन्युरपि विततमन्युर्बभूव यजमानः सुतरां तदविमता मुनिपरिषदपि चुकोप शतमखमुखैः सर्वैरपि बर्हिर्मुखैः सपदि बभूवे विवर्णमुखैः ॥ पद्यम् ॥ दक्षेण तीक्ष्णनियमैर्मुनिभिश्च दत्ताः शापाग्नयस्तमुपसृत्य महाप्रकाशम् ॥ दीपप्रभा इव विनेशुरिनं प्रपद्य माहेश्वरस्य महसः परिभाविकिंवा ॥१२६॥ वज्री वज्रं दंडपाणिश्च दंडं पाशं पाशी क्षौसुषेंद्रः कृपाणम्॥शक्तिं वन्हिश्चक्रमारादुपेंद्रो वीरे तस्मिन्मोक्तुकामा बभूवुः॥१२७॥ जडीकृतास्तस्य विलोकनेन जंभारिमुख्यास्त्रिदशाधिपास्तेः ॥ धृतायुधास्तंभितसर्वगात्राश्चित्रार्पिता योधगणा इवासन् ॥१२८॥ स वीरभद्रोऽथ विनिद्रवैभवो महेशपूजारहिते महाक्रतौ ॥ समेयुषः स्वीकृतभागसत्क्रियान्यथापराधं विबुधानदंडयत् ॥१२९॥ भगस्य नेत्रे शतप-

---

सदस्याच्या गळ्यांत एकाद्या चोराच्या गळयांत खोडा घातल्याप्रमाणें बांधूं लागले. कुत्र्यांनीं कोल्ह्याला जसें बेजारून टाकावें त्याप्रमाणें कांहीं लोक यष्टाला चोहोंकडून बांधूं लागले. याचप्रमाणें इतर कोणी यज्ञसंबंधीं लोक होते, त्यांचाही पराभव प्रमथगणांनीं केला. याप्रमाणें वीरभद्रानें संतापानें एवढें कृत्य केलें तरी यागकर्त्याचा संताप दुणावला, कांहीं ज्ञान नसलेली ती ऋषिसभा संतापली, इंद्रादि सर्व देवांचीं तोंडें उतरलीं. तेव्हां दक्षप्रजापतीनें व तीक्ष्ण नियमाच्या ऋषींनीं महातेजस्वी वीरभद्राला भयंकर क्रूर शाप दिले. परंतु ते सर्व शाप माहेश्वरतेजापुढें न टिकतां तात्काळ आपोआप नष्ट झाले. सूर्यापुढें दिव्याचा प्रकाश पडेल काय? (१२७) तेव्हां इंद्रानें वज्र, यमानें दंड, वरुणानें पाश, सुषेंद्रानें तलवार अग्नीनें शक्ति, उपेंद्रानें चक्र अशीं आयुधें वीरभद्रावर टाकिलीं, (१२८) तेव्हां त्या सर्वांकडे वीरभद्रानें नुसती आपली नजर फेकिली, तितक्यानेंच इंद्रादि सर्व देव आपापलीं आयुधें घेऊन एखाद्या खांबाप्रमाणें स्तब्ध उभे राहिले, त्यामुळें भिंतीवर चित्रांनीं काढलेल्या लढणाऱ्या सैनिकांप्रमाणें दिसले. (१२९) तेव्हां तो वीरभद्र जागेपणानें राहून महेशाची आराधना न केलेल्या त्या मोठ्या यज्ञासाठीं येऊन त्यांत कोणीं कोणीं भाग घेतला होता, त्या त्या सर्व देवांना त्यांच्या त्यांच्या अपराधाला अनुसरून शासन करूं लागला. (१३०) शतपत्रकमलाप्रमाणें विशा-

त्रकांते पूष्णोऽपि दंतान् नवमौक्तिकाभान् ॥ प्रवालशोभामनलस्य जिव्हां प्रसह्य शूलेन जहार वीरः ॥१३०॥ एवं स सर्वानपि देववर्गानेकांगहीनान् सहसा विधाय ॥ मुखेषु तेषां विततान मुद्रां भद्रोऽसृगार्द्रेण पदांचलेन ॥१३१॥ ब्रह्माधोक्षजपूर्वकाः सुरवरा वेदा महाब्राह्मणाः प्रत्यक्षं शिवदूषणेन फलितं पश्यंतु सर्वे फलम् ॥ इत्युच्चैर्भुजमुन्नमय्य कथयन् वीरो गणग्रामणीर्दक्षस्याध्वरदीक्षितस्य विदधे छिन्नं कृपाणाच्छिरः ॥१३२॥ गद्यम् ॥ तत्रांतरे भीतभीतः क्रतुपुरुषो मृगरूपी पर्यधावत् ॥ पद्यम् ॥ अनुदुद्राव तं वीरो धावंतं संहिताशुगः ॥ ब्रह्माणमात्मजारागान्मृगरूपं यथा हरः ॥१३३॥ कोदंडं गुणपरिदृष्टमंडलाग्रं व्याकृष्य द्रुतमिषुणा विवर्जितेन ॥ धावंतं मृगवपुषा स यज्ञदेवं व्यातेने विगतशिरस्कमाशु वीरः ॥१३४॥ पाणितलपाददंडैः परुषालापैश्च तेन वीरेण ॥ व्यभिचारिणीव पत्या वाक्षिप्याहन्यताशु मखलक्ष्मीः ॥१३५॥अर्थे यो ब्रह्महत्याया दोषांशः शिवदूषणे ॥ कार्यते सोऽश्वमेधेन

---

ल डोळे असलेल्या भगाचे डोळे उपटून काढिले, नवीन मोत्याप्रमाणें दिसणारे पूषाचे दांत सर्व पाडून टाकिले, पोंवळ्याप्रमाणें शोभणारी अग्नीची जिभ काढून टाकिली. वीरभद्रानें आपल्या शूलायुधानें एवढें कृत्य केलें. (१३१) याप्रमाणें त्या वीरभद्रानें देवांना अंगहीन करून टाकिलें. याप्रमाणें एकदम करून पुनः रक्तानें लाल झालेल्या आपल्या पायानें त्या त्या देवांच्या तोंडांवर लाथा झाडल्या. (१३२) ब्रह्मदेवा अधोक्षजा, वगैरे देवहो, वेदहो मोठमोठे ब्राह्मणहो, शिवनिंदा केल्याचेंफळ कसें आहे तें पहा. याप्रमाणें हात वर करून सांगत सांगत त्या वीरभद्रानें यज्ञांत दीक्षा घेऊन बसलेल्या दक्षाचें शीर तलवारीनें कापून काढिलें. (१३३) अशा वेळेस यज्ञपुरुष हा भिऊन भिऊन मृगाच्या रूपानें इकडे तिकडे धावूं लागला. सरस्वतीच्या अनुरागामुळें ( प्रेमामुळें ) मृगरूप घेऊन पळणाऱ्या ब्रह्मदेवाच्या पाठीमागें श्रीशिव जसे धांवून गेले त्याप्रमाणें मृगरूपी यज्ञपुरुषाच्या मागें धनुष्य बाण सज्ज करून तो वीरभद्र धांवत गेला. (१३४) तेव्हां वीरभद्रानें धनुष्याची दोरी चढवून मंडलाकार फिरवून त्याला बाण संधान करून मृगरूपी यज्ञपुरुषाचें शिर त्या बाणानें तात्काळ धडापासून वेगळें केलें. (१३५) व्यभिचारिणी स्त्रियेला नवऱ्यानें जसें मारावें, त्याप्रमाणें वीरभद्रानें हाताच्या तळव्यानें, लाथेनें, काठीनें क्रूर भाषणांनीं यज्ञलक्ष्मीला चोपून चोपून काढिलें.(१३६)यज्ञाचा मोठा समारंभ करून त्यांत शिवनिंदा करून ब्रह्महत्येच्या पातकासमान पातक

स दक्षः सुहतोमुना ॥१३६॥ यज्वा ब्रह्मसुतो मखो हयमखो धर्मः सदस्याग्रणीरार्त्विज्यं मुनिभिः कृतं हविरितो देवैः स्वयं स्वीकृतम् ॥ त्राता विष्णुरथाप्यनादृतशिवाः सर्वे दुरंतं गता नाधर्मः शिवदूषकस्य सफलः को वा तदास्ते सुखी ॥१३७॥ अन्वयव्यतिरेकाभ्यां शिवभक्तेः शरीरिणाम् ॥ धर्माधर्मौ विपर्यस्तौ चंडदक्षौ निदर्शनम् ॥१३८॥ गद्यम् ॥ सह यज्ञेन तादृशीमवस्थां साक्षरां यजमानमवलोक्य तत्पत्नी प्रसूतिरेवं प्रलापमकरोत् ॥ पद्यम् ॥ त्वं ब्रह्मपुत्रोऽसि निधिः श्रुतीनां स्वामिन् सदा कल्पितसोमपानः ॥ दुर्वारपाकः सुकृतांतरेण कोऽयं विधत्ते कुलमूलघाती ॥१३९॥ कुत्रापि गात्रं क्वचिदुत्तमांगं बलिप्रयुक्तस्य पशोर्यथा ते ॥ पश्यामि पापा सहिता प्रजाभिर्न दीयते नाथ विलोचनं मे ॥१४०॥ कुतोऽवतीर्णा किल कालरात्रिः सतीति नाम्ना तनया यदर्थम् ॥ दस्योः सुरंगामुखसंयुतस्य दंशोयमासीपन्नसाप्त

ज्या दक्षानें घेतलें त्या दक्षालाच अग्निकुंडांत घालून वीरभद्रानें होम करून टाकिला. (१३७) याग करणारा एवढा ब्रह्मदेवाचा साक्षात मुलगा, यज्ञ तर एवढा मोठा अश्वमेघ यज्ञ, एवढा मोठा धर्म सभासदांचा पुरस्कर्ता, ऋत्विजपणा मोठमोठ्या ऋषींनीं स्वीकारिला होता, देवांनीं तर प्रत्यक्षपणें येऊन हविष्य स्वीकारिलें, एवढा मोठा विष्णु संरक्षण करणारा होता, परंतु केवळ शिवनिंदा केल्यामुळें त्या दक्षाचा अशा रीतीनें पराभव झाला, तर शिवदूषण करून जगांत कोण सुखानें राहील बरें? (१३८) प्राण्यांना अन्वयव्यतिरेकांनीं शिवभक्तीमध्येंच धर्म आणि अधर्म घडतात, याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे चंड आणि दक्ष हेच आहेत.(१३९) असो तेव्हां यज्ञाची आणि दक्षाची तशी झालेली अवस्था पाहून त्याची पत्नी प्रसूति अतिशय प्रलाप करूं लागली. महाराज, आपण प्रत्यक्ष ब्रह्मपुत्र अहांत, व वेदांचें निधान अहांत परंतु नेहमीं सोमपानाची कल्पना करून अशा या पापकर्मानें वंश निर्मूल करण्याचा हा परिणाम कोण करून घेईल बरें? (१४०) महाराज, पशु तोडून चारी दिशेला बलि जसे टाकावेत, त्याप्रमाणें तुमचें शरीर एकीकडे पडलें, व डोकें एकीकडे पडलें, व तुमच्या सर्व प्रजेची देखील हीच स्थिति झाली आहे, असो पण मला देवानें डोळे न दिले असते तर हें सर्व मी कोठून पाहत होत्यें. (१४१) अगबाई ! ही सती नांवाची काळरात्र माझी मुलगी होऊन कोठून अवतरली कीं कोण जाणे ! सुरुंग खणून भित पाडणाऱ्या चोराला सर्प

बंधो॥१४१॥क्व ते मम श्रीः क्व च वेदघोषः क्व ते तपस्याकुलगौरवं वा॥ त्वमाततायीव वधं गतोऽभूर्महाविपत्त्यै महतां विरोधः ॥१४२॥ मया महादेव तथा विरोधं मुंचेति पादे पतितं मुहुस्ते ॥ निर्भर्त्स्यमानाथ निरंकुशोऽभूः प्राणांतिकं तत्फलमाहितं ते ॥१४३॥ त्वमेक एवेश्वरदूषकोऽभूस्त्वया सहैते गमिता दुरंतम् ॥ वेदा मुनींद्राः सकला इदानीमेकस्य दोषेण बहोः प्रणाशः ॥१४४॥ देवाः समस्ता अपि हंत यज्ञे प्राप्ता महादेवबलेन भंगम् ॥ महागजेंद्रस्य महोपमर्दं कथं सहंते कलभा विगंधाः ॥१४५॥ आहतोऽसि ॥ गात्रं क्वापि कवंधतामुपगतं संवीतकृष्णाजिनं सोमास्वादसुगंधवत्क्कमलं दूरे शिरो भूगतम् ॥ ब्रह्मन् वीक्ष्य पितामहैष्यसि मुदं पुत्रस्य ते यज्ञिनो व्यावृत्तो यमकारि येन स पुरा विश्वेशनिंदादरात् ॥१४६॥ गद्यम् ॥ इति बहुविलपंती सा

---

दंश वगैरे कसा व्हावा, त्याप्रमाणें आप्तबंधो, आह्मांला ही मुलगी झाली. (१४२) महाराज, माझें ऐश्वर्य कोठें गेलें; तो वेदघोष कोठें गेला, तुमची ती तपश्चर्या कोठें गेली? तुमच्या वंशाचा गौरवपणा कोठें गेला? फांशीला जाणाऱ्या एखाद्या माणसाप्रमाणें तुह्मी इहलोक सोडून गेलांत, तर यावरून मोठ्याशीं द्वेष बांधून घेणें मोठ्या संकटाला कारण होतें असें सिद्ध होत नाहीं काय? (१४३) महाराज, आपण त्या मोठ्या देवाशीं विरोध करूं नका ह्मणून पुष्कळ वेळ पाया पडून सांगितलें, परंतु तेव्हां आपण स्वेच्छाचारी होऊन माझीच निर्भर्त्सना (निंदा) केली, सांप्रत प्राणांत फळ मिळालें त्याचा अनुभव आतां कोण घेत आहे बरें? (१४४) महाराज, आपण एकटेच शिवनिंदक असून सर्व ऋषि, वेद हे विचारे निरपराधी असून मोठ्या आपत्तींत पडले, एकाच्या अपराधानें पुष्कळांचा नाश होतो ह्मणतात. तें खोटें नव्हें. (१४५) महाराज, या यज्ञामध्यें महादेवाच्या पराक्रमानें सर्व देव पराभव पावले. मोठ्या गजेंद्राचा उपमर्द लहान लहान हत्ती कसें सहन करतील बरें? (१४६) हाय हाय नष्ट झालांत हो, नष्ट झालांत. महाराज, आपलें शरीर नुसतें कवंध होऊन कोठें पडलें कोण जाणें? कृष्णाजिनाची टोपी घातलेलें, सोमाचा आस्वाद घेऊन सुगंधमय झालेलें तें शिर कोठें जमिनींत रुतलें कीं काय कोण जाणें? हाय हाय? ब्रह्मदेवा, पितामहा, आपल्या मुलाला पाहण्याकरितां आलांत तर श्रीशिवाच्या निंदेमुळें अशी पुत्राची दशा झाली ह्मणून पाहणार ना? (१४७) याप्रमाणें ती प्रसूति अतिशय विलाप करून आपल्या मुला

पत्या सह मरणोत्सवमकरोत् ॥ तत्रांतरे रुद्रानुचरेण वीरभद्रेण विरचितायां पंचतायां यजमानस्य सहर्त्विजो याज्यदेवतानां तादृशीं दुःखवस्थामधिगम्य हरिपितामहौ पशुपतिं प्रसादयितुमुपागतौ ॥ पशुपतिरपि प्रालेयपर्वतस्य परिसरमधिवसन् अपगतरोषावेशविशदप्रसादपेशलेन परिगलितकलंकरजनिकरमंडलानुसाकारिणा तनुमंडलेन शुभदर्शनो निखिलदर्शनरहस्यसामरस्यविमलादर्शतया दक्षिणकरतललक्षितया बोधमुद्रया परिसरजुषां सनकसनंदनसनत्कुमारऋभुदधीचिपुलस्त्यागस्त्यगौतमपुरःसराणां परमर्षिणामांतरं तिमिरमपि भिदानोऽतिकवासिन्या प्रथमांते प्रणत्या भारत्या पुनः पुनराकर्ण्य पंचवर्णपरविद्याप्रसंगो निरंकुशगतिरपि निभृतानुभावैरुपशमनोल्वणैः परिवारगणैरपि परिगतपरिसरः परिलंबितप्रणवमयपीठिकाचतुरंतचतुर्वेदैरपि वेदैः सागर इव अमृतमयः सपदि तयोस्सन्निदधे सकलदेवताग्रामणीश्चंद्रशिखामणिः तत्र तमवलोक्य शांतमनसं शतानं-

---

बाळांसह मरणाची तयारी करूं लागली. अशा वेळेस रुद्राच्या अनुचर वीरभद्रानें यजमान, ऋत्विज, यांचा नाश केल्यानंतर त्या सर्वांची दशा अशी झालेली आहे असें जाणून श्रीहरि आणि ब्रह्मदेव हे दोघे श्रीपशुपतीजवळ येऊन प्रार्थना करूं लागले. तेव्हां श्रीपशुपती देखील हिमालयाजवळ येऊन राहिले होते तेव्हां त्यांचा संताप शांत झाला होता म्हणून प्रसन्नस्थितीमध्यें होते, त्यामुळें श्रीशिवाचें शरीर चंद्रमंडलाप्रमाणें आल्हादकारक दिसत होतें, पाहणाऱ्यांना आनंद होत असे, व त्या श्रीशिवाच्या सभोंवतीं सर्व वेदांतशास्त्रांतील रहस्य जाणणारे, अर्थात आरशांत पाहिल्याप्रमाणें चांगल्या ज्ञानानें शिवतत्व पाहणारे, सनक, सनंदन, सनत्कुमार, ऋभु, दधीचि, पुलस्त्य, अगस्त्य, गौतम वगैरे मोठमोठे ऋषि बसले होते, त्या ऋषींच्या अंतर्यामांत असलेलें अज्ञान श्रीशिव ज्ञानमुद्रेनें काढीत होते, जवळ बसलेल्या ऋषींचीं मंत्रसहित वाक्यें वारंवार ऐकून ( जवळ बसलेल्या ऋषींची वाणी ऐकून असें तात्पर्य आहे. ) पंचवर्णपर विद्येची चर्चा करीत शिव बसले होते. आपण स्वतः निष्प्रतिबंध गतीचे असले तरी महाप्रतापी, शांतिगुणानें युक्त असा परिवार घेऊन शिव बसले होते. लोंबत असलेल्या प्रणवमय पीठिकेच्या सभोंवतीं असलेल्या चार वेदांनीं सागराप्रमाणें अमृतमय होऊन सर्व देवांमध्यें श्रेष्ठ चंद्रशेखर श्रीशिव प्रसन्न होऊन बसले होते. त्याठिकाणीं शांत मनाच्या श्रीशिवाला पाहून इंद्रादिदेवाला मंगलकर देवतांच्या कार्यांचा निश्चय क-

दमकुटोपशोभनं सुरकार्यमवधार्य प्रणतिपूर्वं परमार्थगतिभिः स्तुतिभिः प्रसादयताम् ॥ पद्यम् ॥ परं परानंदमयं रहस्यं दूरे गिरां शंकर ते स्वरूपम् ॥ घोराणि शांतान्युभयात्मकानि मायागुणैराश्रयसे वपूंषि ॥१४७॥ त्वत्कोपलेशप्रभवोऽद्य वीरः स्वामिन् जगत्संहरणप्रवीणः ॥ दक्षं च यज्ञं विबुधान् मुनींद्रान् स्वांगेन हीनान् कृतवानशेषान्॥१४८॥ आवामुभौ ते महिमावबोधात् त्वद्वेषिणस्तस्य गतो न यागम् ॥ अनंगभागाववशेषितौ ते विज्ञापनार्थं विपदः सुराणाम् ॥१४९॥ अग्निः स्वतंत्रोयमनादिकर्म पतिः स्वकार्येषु पते पशूनाम् ॥ तत्प्रेरणाप्रेरितया प्रवृत्या स्वर्गालयः स्यान्नरकालयो वा ॥१५०॥त्वय्यप्रसन्ने सुखिनः कथं वा सुरा मनुष्याः पितरस्तथान्ये ॥ प्रसादतस्ते खलु देव पुंसां स्वाराज्यपूर्वाणि सुखास्पदानि ॥१५१॥ संरक्षिताः सागरकालकूटात् सर्वे सुरा विश्वपते त्वयैते ॥ किंवा नतेऽमी पशवः कृतघ्नाः कृपानिधे कीटसमानिवैतान् ॥१५२॥ क्रीडापात्रमिदं शंभो तव सर्वं चराचर-

---

रून नमस्कारपूर्वक यथार्थ अर्थाच्या स्तोत्रांनीं ते दोघे शिवाची स्तुति करूं लागले. श्रेष्ठ, श्रेष्ठ आनंदस्वरूप, परमरहस्य, असें तुमचें स्वरूप हे शंभो, वेदवाणीला देखील अतिशय दूर वाटत आहे. परंतु, आपण भयंकर, व शांत, व दोन्ही तऱ्हेचीं शरीरें मायेच्या गुणानें धारण करतां (१४८) प्रभो, तुमच्या संतापाचा थोडा अंश देखील जगाचा संहार करावयास पुरे आहे. प्रस्तुत दक्ष यज्ञांत, देव, ऋषि हे सर्व आपल्याच ( शिवाच्याच ) संतापानें अंगहीन होऊन जिकडे तिकडे पडले आहेत. (१४९) आह्मी दोघे तुमचा प्रभाव जाणतों ह्मणून त्या यागाला गेलों नाहीं. ह्मणूनच आह्मी अंगानें शाबूद आहोंत तर यावेळेस देवांना विपत्ति काय आली आहे, तिचें निवारण व्हावें ह्मणून प्रार्थना करावयास आलों आहोंत. (१५०) प्रभो, हा अग्नि स्वतंत्र आहे काय? पशुपते, स्वकार्याविषयीं त्याचें त्याचें अनादिकर्म काय असतें तें तुझेंच रूप असून स्वतंत्र आहे त्याच्या प्रेरणेनें प्राणी नरकास जातात, किंवा स्वर्गास जातात. (१५१) हे देवा, आपण जर प्रसन्न झाला नाहींत तर देव, मनुष्य, पितर व इतर यांना सुख कसें मिळेल बरें? प्रभो तुमचा प्रसाद झाला तरच स्वाराज्य वगैरे सुखें मिळतात. (१५२) हे पशुपते, समुद्रापासून उद्भवलेल्या कालकूटापासून सर्व देवांचें संरक्षण केलें, तेच पशु आह्मी नाहींत काय? आह्मी कृतघ्न आहोंत परंतु देवा, तुह्माला आह्मी यःकश्चित किड्यासारखें आहोंत. (१५३) हे शंभो, चराचर सर्व जग तु-

म् ॥ निग्रहाण रुषा नित्यं कृपयानुग्रहाण वा ॥१५३॥ गद्यम् ॥ इति त-योः सुरकार्यविज्ञापनानंतरं कृतकृत्यो वीरभद्रस्तमुपसृत्य कृतप्रणामोऽभूत् ॥ अये वीर हरिपितामहयोरनुरोधेन क्षांतो मयाऽपराधो देवानाम् ॥ यस्य सहर्त्विजो यजमानस्य च मखाक्षगौरवाद्यथापूर्वं सर्वांनंगैः प्राणकलया संयोजय ॥ दक्षस्य दुरात्मनो मम दूषणफललक्षणाय कवंधे छागशिरः संधाय शिवकला दीयताम् ॥ पशुपतेराज्ञया स तथाकरोत् ॥ ततो लब्धबोधा देवा देवमुपसृत्य प्रणम्य लज्जावनतमुखा मूढाः स्तुतिमकुर्वन् स भगवानपि तानवलोक्य सानुग्रहमवादीत् ॥ पद्यम् ॥ पुत्रा मे कमलासनप्रभृतयो देवा भवंतः पुरा यज्ञेशेन मया पृथङ्नियमितो यज्ञांशदायोऽपि वः ॥ मत्पूर्वारहितं मखं भ्रमवशाद्देवा गता दंड्यतां मावज्ञां वहतेऽद्य बोधजननाद्दंडोऽपि वोऽनुग्रहः ॥१५४॥ गद्यम् ॥ किं च ब्रह्मणोऽस्य पुत्रतो बहुमानात्प्रसूतेश्च मयि

---

झाला खेळावयाचें साधन आहे. तर अशा जगावर संताप करा, किंवा कृपा करून अनुग्रह करा. (१५४) याप्रमाणें ब्रह्माविष्णूंनीं देवकार्याविषयीं विज्ञापन केल्यानंतर कृतार्थ झालेला वीरभद्र येऊन श्रीशिवास नमस्कार करून उभा राहिला. मग शिव बोलले हे वीरा वीरभद्रा, विष्णु ब्रह्मदेवांला अनुसरून ( यांच्या भिडेनें ) सर्व देवांचा अपराध सहन केला आहे. याकरितां दक्षयज्ञामध्यें यजमान ऋत्विज वगैरे लोकांना गौरवानें सजीव करून पुनः अवयवसहित कर. दुरात्म्या दक्षानें माझी निंदा केली याकरितां याची आठवण वरचेवर होण्याकरितां त्याच्या कबंधावर बकऱ्याचें डोकें ठेवून शिवकला देऊन टाक ( पुनः सजीव कर ).याप्रमाणें पशुपतीची आज्ञा ऐकून वीरभद्रानें सर्व कांहीं त्याचप्रमाणें केलें. नंतर सर्व देवांना ज्ञान प्राप्त झाल्यामुळें सर्वही श्रीशिवाजवळ येऊन नमस्कार करून लाजेनें तोंड खालीं करून श्रीशिवाचें स्तोत्र करीत राहिले. श्रीशिवांनीं देखील त्यांना पाहून अनुग्रहपूर्वक ह्मटलें. देवहो, ब्रह्मादिदेव सर्व तुह्मी माझींच मुलें आहांत. यज्ञेश असा मीं यज्ञामध्यें यज्ञांतला भाग निरनिराळा करून दिला आहे. परंतु प्रस्तुत या यज्ञामध्यें माझा भाग नसून भ्रांतीनें त्या यज्ञाला तुह्मी सर्व गेलांत ह्मणून तुह्माला मीं शासन केलें तें शासन देखील ज्ञानसाधन झाल्यामुळें अनुग्रहालाच कारण झालें आहे. (१५५) व दक्ष हा ब्रह्मदेवाचा मुलगा असल्यामुळें माझ्या ठिकाणीं भक्ति करणारी प्रसूति याची बायको असल्यामुळें तिला मान

भक्तिलवशालिन्या येन बहुक्रतुकर्तृतागौरवेण दक्षस्य मद्द्विषो दंडानुग्रहाय जनितमद्बोधस्य भवतु गणाधिपत्यम्॥ स्मृत्वा स्मृत्वैवं यस्मान्मां निर्निंद निरंतरम्॥ पद्यं॥ स्मृतेः फलं गणेशत्वं निंदायाः पशुवक्रता॥१५५॥वृत्तं॥विश्वस्य स्वकृतिश्रियः पतिरसौ बीजं विधाताप्यसौ बीजत्वावसिते निमित्तनियमे विश्वात्मकोऽहं स्थितः॥ कार्यान्नः (न्मे) सकला निरूढमुनयो मत्ताविभिन्नाविमौ तावेतौ भजतामरा ममवधूमाभ्यामसाध्ये विधौ॥१५६॥ इति प्रसादसुभगमभिधाय परमेश्वरेण विसृष्टा ब्रह्मादयो स्वस्वमावासमायासिषुः॥ पशुपतिरपि देवीरहितः परमयोगिभिः सह विश्वकार्यविमुखस्थानं दर्शितसमाधिपरमेवं प्रशममभ्यवासीत्॥१५७॥

इति श्रीकविवादिशेखरकृतौ शिवचरिते तृतीयोच्छ्वासः॥

---

देण्याकरितां पुष्कळ यज्ञ करण्याच्या कर्तृत्वाच्या गौरवानें माझ्या द्वेषी दक्षाला दंड केला तरी तो अनुग्रहालाच कारण झालेला आहे. त्या दंडामुळें ज्ञानी झालेल्या दक्षाला एका गणावरचा अधिकार मिळो. याला कारण ह्मणजे वारंवार माझें स्मरण करून करून त्यानें माझी निरंतर निंदा केली. त्यानें माझें स्मरण केलें ह्मणून गणाधिपत्य दिलें आहे, व निंदा केली ह्मणून बकऱ्याचें तोंड दिलें आहे. (१५६) हे देवहो पालनाचा स्वामी विष्णु असून सृष्टीचा स्वामी ब्रह्मदेव आहे ( पालनाचा अधिकार विष्णूकडे असून सृष्टीचा अधिकार ब्रह्मदेवाकडे आहे असें यांतलें तात्पर्य आहे )व प्रलयाच्यावेळेस संहार करावयाचें काम सर्वांतर्यामी मी करितों तथापि कार्यवशात ब्रह्माविष्णु हे माझ्यापासून भिन्न आहेत असें ऋषि जाणतात. ते दोघे माझ्यापासून भिन्न नाहींत याकरितां त्यांचेंही भजन करा व यां दोघांना जें असाध्य काम आहे तें काम माझी पत्नी पार्वती करित्ये तिचेंही भजन करा. (१५७) याप्रमाणें परमेश्वरानें सर्वांवर अनुग्रह करून सर्वांना निरोप दिला. नंतर सर्व ब्रह्मादिदेव आपापल्या स्थानांला निघून गेले. नंतर देवीला सोडून देऊन श्रेष्ठ योग्यांबरोबर योग करावयास श्रीशिव निघून गेले.

याप्रमाणें श्रीकविवादिशेखरकृत शिवचरित्रांतील तिसरा उच्छ्वास संपला.

॥ समाप्तोऽयं ग्रंथः॥

# विक्रीस तयार.

## वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतरासह असलेल्या संस्कृत ग्रंथांची यादी.

| | रु. आ. पै. |
|---|---|
| १. वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| २. सिद्धांतशिखामणि १ भाग | १- ८-० |
| ३. सिद्धांतशिखामणि २ भाग | १- ८-० |
| ४. बसवेश्वरपुराण व्यासोक्त भाग १–२ प्रत्येकीं | १- ८-० |
| ५. वीरशैवाचारप्रदीपिका | २- ०-० |
| ६. हरिहरतारतम्य | ०- ४-० |
| ७. विशेषार्थप्रकाशिका | ०- ७-० |
| ८. रामायणसारसंग्रह | ०- ६-० |
| ९. उपयुक्त वेंचे | ०- ७-० |
| १०. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०- ४-० |
| ११. पारमेश्वरागम भाग १ | १- ०-० |
| पारमेश्वरागम भाग २ | १- ०-० |
| १२. कैवल्यसार. | ०- ६-० |
| १३. प्रभुलिंगलीला भाग १ | १- ८-० |
| १४. प्रभुलिंगलीला भाग २ | १- ४-० |
| १५ प्रभुलिंगलीला भाग ३ | १- ०-० |
| १६. पंचाचार्यपंचमोत्पत्तिप्रक० | ०- ६-० |
| १७. वीरमाहेश्वरप्रकरणम् | ० ८-० |
| १८. दीक्षादिकथनम् | ०- २-० |
| १९. सूक्ष्मागम | ०-१०-० |
| २० संक्षिप्त लिंगपूजाविधि. | ०- ०-९ |
| २१. वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपट. | ०- १-० |

| | रु. आ. पै. |
|---|---|
| २२. व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध. | १-[illegible] |
| २३. शिवपरअभंग | ०-[illegible] |
| २४. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १—२ प्रत्येकीं | [illegible] |
| भाग ३ | [illegible] |
| २५. पादोदकविचार | [illegible] |
| २६. वीरमाहेश्वराचारसंग्रह भाग १ | [illegible] |
| भाग २ | [illegible] |
| २७. मराठी सिद्धरामेश्वर चरित्र | [illegible] |
| २८. वीरशैवदीक्षाविधि | [illegible] |
| वीरमाहेश्वरदीक्षाविधि | [illegible] |
| २९. शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण | [illegible] |
| ३०. शिवपुराण वायवीयसंहिता पूर्व व उत्तरभाग प्रत्येकीं | [illegible] |
| ३१. भारतसार संग्रह | [illegible] |
| ३२. वीरशैवखानेसुमारी | ०-[illegible] |
| ३३ अनादिवीरशैवसारसंग्रह भाग १ व २ प्रत्येकी. | १- ८[illegible] |
| ३४. वीरशैवमतसंवर्धिनी | ०- २[illegible] |
| ३५. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०-११[illegible] |
| ३६. संक्षिप्तविवाहविधि | ०- ३[illegible] |
| ३७. दशकर्मपद्धति | १- [illegible] |
| ३८. तात्पर्यसंग्रह | ०-[illegible] |

३९ वीरशैवांच्या धर्मसमजुतीस सरकारांतून मान किं० २ आणे

**छापत असलेले ग्रन्थ.** १ वीरमाहेश्वराचारसंग्रह ३ भा०. २ शिवपूजाविधि.

**ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणेंः**—वरील ग्रंथ रा. रा. चनवसप्पा वारद यांचे मुं[illegible] विजापूर सोलापूर व कलबुर्गा येथील दुकानीं विकत मिळतील.

आह्मी छापलेले धर्मग्रन्थांपैकीं कोणच्याही ग्रन्थाची दुसरी आवृत्ति काढण्याची कोणाची मर्जी असल्यास त्यांस आमची परवानगी आहे कारण धर्मग्रन्थांचा जितका प्रसार होईल तितका [illegible] अशी आमची इच्छा आहे.

प्रसिद्धिकर्ता.